लेखनकाल – ऑगस्ट – सप्टेंबर १९३९

प्रसिद्धि — ता. २२ ऑक्टोबर १९३९



प्रकाशकाचे नांवें पत्रव्यवहार करावा.

मुद्रक
**कृष्णाजी नारायण सापळे**
रामकृष्ण प्रिन्टिंग प्रेस, त्रिभुवन रोड, मुंबई ४

प्रस्तुत कथा पर्णपणें स्वतंत्र असून कल्पित आहे. यांतील सर्व पात्रें व घटना काल्पनिक आहेत.

या कथेंतील पात्रांपैकीं कोणत्याहि नांवाचें अगर स्वभावचित्राचें एखाद्या विद्यमान् किंवा मृत व्यक्तीच्या नांवाशीं किंवा स्वभावाशी साम्य दिसून आल्यास तो केवळ काकतालीय न्याय आहे असे समजावें. लेखकाचा तसें बुद्धिपुरस्सर करण्याचा मुळीच हेतु नाही.

प्रस्तुत कथेंत जिनोव्हा ते मुंबई यांच्या दरम्यान प्रवासी वाहतुक करणाऱ्या इटालिअन बोटीचा उल्लेख व वर्णन आहे; ते पूर्णपणें काल्पनिक आहे. सध्यां अशी वहातुक करणाऱ्या कोणच्याहि इटालिअन कंपनीचें, बोटीचें अथवा त्यावरील अधिकाऱ्यांच्या वर्तणुकीचें वर्णन करण्याचा लेखकाचा उद्देश नाहीं.

पृष्ठ १६–१७ वरील रॉयल कमिशनसंबंधीचा उल्लेख फिलिफ गिब्स यांच्या Ordeal in England या पुस्तकाच्या आधारावर केला आहे. सर फिलिफ हे त्या रॉयल कमिशनचे सभासद होते.

पृष्ठ १०६ वर बरेच वर्षांपूर्वी वाचलेल्या एका इंग्रजी कवितेचा उपयोग केला आहे.

—लेखक

युरोपांतून लेखकाकडून जसजसा मजकूर आला तसतसा तो छापून निघाला. प्रेस-कॉपी तयार करतांना लेखकाची मदत मिळविणे शक्य नव्हते. लेखकाच्या नजरेखालून प्रुफें जाणेंहि अशक्य होते. कादंबरीत क्वचित् कोठें एकसूत्रीपणाचा अभाव आढळला तर तो या अपरिहार्य परिस्थितीचा दोष आहे या दृष्टीनें वाचक त्याकडे पाहतील अशी आशा आहे.

—प्रकाशक

## —१—

चहूंकडे धांदल चालली होती. सगळ्यांच्या अंगावर ठेवणींतले पोषाख चढले होते. घर आलें म्हणून चेहरे फुललेले होते. रस्त्यांत जागजागीं सामान येऊन पडत होतें. सूट–केसिस, केबिन–ट्रंका, हॅटच्या पेट्या, टेनिसच्या बॅग्स. प्रत्येकावर रंगीबेरंगी लेबलें. बोटीच्या नांवाचीं, कस्टम्सच्या नंबरांचीं, केबिन्सचीं, बॅगेज रूम्सचीं. सगळ्यांत सुंदर लेबलें हॉटेल्सचीं असत. ज्या हॉटेलांत तें सामान जाई तिथलें लेबल त्यावर चढे. बर्लिन, प्राग, अम्स्टर-डाम, लासेन, लंडन. नांवें सुंदर आणि चित्रें सुंदर. रोज तीं मी बघत असें. भारी गंमत वाटे. पण आज सगळीकडे घाई. त्या बॅग्स, त्यांचे कोपरे, टोंकें पायाला लागत. पण कुणाला दरकार नव्हती.

मी केबिनमधें गेलों. माझी बर्थ वरची होती. हातपाय गळून गेले होते. कसा तरी वर चढलों आणि बिछान्यावर अंग टाकलें.

उशासमोरच पोर्टहोल होतें. बाहेर नजर टाकली. आकाश झाकोळलें होतें. त्यामुळें सगळें खिन्न वाटे. समुद्राचें डबकें झालें होतें. शांत आणि गढूळ. मधेंच थोडें ऊन पडलें. समोर कांहीं होडगीं होतीं. त्यावर लाल पोषाखाचे खलाशी दिसत. लाटा वर वर येत. त्यांच्या शिखराशिखरांवरून तीं होडगीं उड्या मारीत जात. झाडांवरच्या माकडासारखीं भासत. मध्येंच

डुलत असलेलीं बॉइज् दिसत. पलीकडे एक दीपगृह होतें. दूर क्षितिज. त्याची रेषा तळपूं लागली. तिकडेच बोट परत फिरणार होती. माझा प्रवास संपला होता. मला मुंबईला उतरायचें होतें. पण माझे विचार बोटीच्या पुढच्या प्रवासाबद्दल चालू होते. दोन दिवसांनीं कोलंबो, नंतर सिंगापूर, मणिला, हाँगकाँग आणि आजपासून पंधरा दिवसांनीं शांघाय !

माझ्या अंगावर एकाएकीं कांटा आला. हॅर्टा शांघायला जाणार होती. मला इथेंच उतरायचें. उतरायचें खरें, पण उठायची इच्छा होईना.

## —२—

उठायची इच्छा होईना इतकेंच नव्हे. मुंबई आली. सगळ्यांना आनंद झाला. पण मला वाईट वाटलें ! हिंदुस्थान माझी जन्मभूमि. दूर देशाहून मी आलों. पहिल्या दर्शनानें आनंद व्हावा ना ? पण मला दुःख झालें ! माझें सगळें जगच बदललें होतें. उफराटें झालें होतें. एडन गेलें तेव्हां आतां मुंबईच अशी धास्ती वाटे. तरी आशा वाटे. समुद्रांत तुफान होतें. तेव्हां विचार येई हें वाढलें तर बरें. बोट हळूं चालेल. मुंबई उशिरां येईल. समुद्रावरचा प्रवास जमिनीपेक्षां निराळा. चहूंकडे तेंच पाणी दिसायचें. तिथें हें मागें गेलें तें मागें गेलें अशा खुणा दिसत नाहींत. त्यामुळें मन समाधान करून घेई. अजून मुंबई लांब आहे. पण ठरलेली वेळ ती यायचीच. ती आलीच. आम्हीं डेकवर उभे होतों. हॅर्टा एकदम जवळ आली. डोळे डबडबलेले होते. आवाज कातर झाला होता. म्हणाली, " पाहिलंस तें ? " मीं म्हटलें, " काय ? " तिनें रडत उत्तर दिलें, " बॉब, ती पायलट बोट. मुंबई बंदराची. हिंदुस्थान आलें रे अखेर. आतां तूं जाणार ! " आणि अश्रू घळघळायला लागले.

तेच अश्रू. त्यांचा त्या दिवशीं पूर वाहिला. बोट बंदरांत आठ तास उभी होती. हिंदी प्रवासी सगळे घरोघर गेले. मी बोटीवरच होतों. सुटायच्या पूर्वी अर्धा तास आधीं उतरलों. तरी पण पाय मागें ओढत. बोटीवरची वर्दळ

थांबली. दुपारीं नव्या प्रवाशांची धांदल सुरू झाली. मला त्याची दख्खल नव्हती. धक्क्यावर आलों. डेकसमोर उभा राहिलों. क्रेन्स सामान चढवीत होत्या. खालच्या मजल्यावर अन्नाचा सांठा चढत होता. मधल्या डेकवर प्रवाशांचें सामान चढत होतें. वरच्या डेकवर प्रवासी. सगळे हंसत खिदळत. कुणाच्या गळ्यांत हार, कुणाचे हात तुऱ्यांनी फुललेले. झकपक रंगीबेरंगी पोषाख. शिपाई, खलाशी, पोलिस-अधिकारी, दलाल, व्यापारी. सगळी पुन्हां एकच गर्दी. गेले अकरा दिवस मी नेहमी हें बघत असें. प्रत्येक बंदरावर तेंच. नेपल्स, मसावा, पोर्ट सैद, सुवेझ, एडन. पण त्यावेळीं मी डेकवर असें. आज धक्क्यावर होतों. त्यावेळीं हॅर्टा लहान मुलीसारखी इकडून तिकडे धांवे. मला ओढी. म्हणे, "बॉब, तें बघ. किती मजेचं आहे नाहीं?" आज ती समोर होती. पण तिला बोलतां येत नव्हतें. तिच्या अश्रूंना खंड नव्हता. तिच्याजवळ प्रवासी उभे होते. एखादा खलाशी येई. वात्रटपणा करी. पण लक्ष नव्हतें तिचें. मलाहि कांही सुचेना. जवळच्या फुलवाल्याकडून मी एक फुलांचा छडा घेतला. हमालाला एक आणा दिला. त्याला हॅर्टाला तो नेऊन दे म्हणून सांगितलं. त्याला आश्चर्य वाटलं. पण तो गेला. मी मनांत म्हटलं, "हॅर्टा, पोरी हा अखेरचा निरोप."

पण हेंच अर्ध्या तासापूर्वी म्हटलें होतें. डेकवर तिची मिठी कष्टानें सोडवली आणि म्हटलें, "Goodbye, friend!" ती थोडी खिन्न झाली आणि म्हणाली, "बॉब, मला इंग्रजी येत नाहीं. थोडं तूंच शिकवलंस पण Goodbye, my dearest असं तूं म्हणायला पाहिजेस नव्हे का?" मीं तिचा हात हातांत घेतला आणि म्हटलें, "तूं शांघायला गेलीस म्हणजे तुला कळेल, मैत्रीच फक्त उरली आहे! आपली प्रीति हरपली. Good-bye dear little friend!" आणि मी खालीं आलों!

शब्दांचा कांहीं उपयोग आहे का? या लिहिण्याला कांहीं उद्देश असेल का? हॅर्टा पुन्हां मला दिसणार नाहीं. ऐन तारुण्य. सगळें जग समोर. सगळ्या शक्ति आधीन आणि दोन मानवी जीव जवळ येतात, हातांत हात

घेतात आणि म्हणतात, "हा भेटीचा क्षण अखेरचा." असें आयुष्यांत सहसा कधीं होतें का? मृत्युवेळेशिवाय? पण आमचें तसें झालें. वर्दळ वाढली. गँगवे वर गेला. कॅप्टनच्या ब्रिजवरून शिट्या, बोटीचे कर्णे, खलाशांच्या आरोळ्या, नांगराची प्रचंड घरघर! बंदरावरच्या लोखंडी खांबांना बांधलेले बोटीचे दोर होते ते सैल सुटले. पाण्यांत पडले. त्यांचा सपसप आवाज होऊं लागला. विविध आवाजांच्या प्रचंड कोलाहलांत बंदर बुडून गेलें. बँडचा सुस्वर ध्वनि उमटला. प्रवाशांचे निरोप, पुन्हां सुमालाची तोरणें, निशाणें, बोटीवरून धक्क्यावर फेकलेले हारतुरे, त्यांचा वर्षाव, डोळ्यांत अश्रू आणि हंसऱ्या चेहेऱ्यांचे निरोप......

बोट हलली. माझ्यानें वर बघवेना. त्या कोलाहलानें हृदय गुदमरून गेलें. बिचारी, गरीब बिचारी हॅर्टा!

—३—

मी बिछान्यावर पडून आहें. आजारी नव्हे. पण उठवत नाहीं. शक्तिच नाहीं. खिडकींतून वांकून मी बघतों. संध्याकाळ झाली आहे. एम्पायर हॉटेलच्या खालचा चौक. मुंबईत हा सगळ्यांत मोठा. त्याच इमारती. माणसांची झिम्मड. ट्रामगाड्या, बसेस, मोटारी. सगळा तोच कोलाहल.

सगळीं शहरें आठवतात. लंडन, पॅरिस, व्हेनिस, नेपल्स. माझा एक मित्र आहे. त्याला विचित्र वेड असे. मध्येंच बोलतां बोलतां तो थांबे. कुठेंतरी बघे. मी म्हणे, "जगू कसला विचार करतोस?" त्याचा स्वर आकुल होई. तो म्हणायचा, "तूं हंसशील. आतां चार वाजले आहेत. माझ्या मनांत एकदम कल्पना येते. आतां कलकत्ता मेल नागपूरला असेल, दिल्ली एक्स्प्रेस झांशीला, पंजाब मेल दिल्लीच्या स्टेशनवर, फ्रॉंटिअर नागद्याला असेल. मद्रास नुकती सोलापूरहून सुटेल." मला हसूं यायचें. पण त्याचें मन सारखें भटकायला बघे. आम्ही पतंग उडवावे. तेव्हां त्याची कल्पना चाले. खूप उंच पतंग जावा. त्यावर जाऊन खालीं बघितलें तर केवढा विस्तीर्ण

प्रदेश एकदम दिसेल. एकाच वेळीं सगळ्या गाड्यांतून हिंदुस्थानभर त्याचें मन भटके. किती साहजिक आहे हें! आज मला पटतें. संध्याकाळ झाली आहे ना? आतां लंडनमध्यें १२ वाजले आहेत. यावेळीं मी पिकॅडिलीत असें. आणखी अर्ध्या तासानें लंचची वेळ. कामावरून निघे.— शॅफ्ट्स्बरी अव्हिन्यूमधून पिकॅडिली. नॉर्थ रीजंट स्ट्रीटला वळसा घालून व्हाईन स्ट्रीटमध्यें जाई. तिथें माझें एक आवडतें उपहारगृह असे. बरोबर माझ्याच कॉलेजांतली एक मुलगी. तिच्यावर माझें प्रेम नव्हतें. तिचेंहि माझ्यावर नव्हतें. पण संगत सोबत किती सुखावह असते! पिकॅडिलीच्या मधोमध एक कारंजें आहे. त्यावर मदनाचा सुंदर पुतळा आहे. आम्ही रोज त्या कारंज्याच्या पायऱ्यावर जाऊन उभें रहावें. इतकी रहदारी. वाहनांचे, पथिकांचे पूरच्या पूर चौकांत येत आणि भराभर ओसरत. पण सगळी शिस्त. चित्रविचित्र पोषाख, सुंदर चेहेरे, उंच टांचांच्या बुटांची, मनोहर shapely पायांची वेडावणारी चटचट! सगळीकडे अत्तरांच्या तेलांचा, पावडरींचा घमघमाट! ऊन पडे तेव्हां तर सगळ्या सौंदर्याला तुफान भरती येई. दोनच आठवडे झाले. तो माझा अत्यंत आवडीचा देखावा. त्यांत मी रोज जगे.

आणि पॅरिस? ती जुलैची १४ तारीख होती. फ्रेंच राज्यक्रांतीचा १५ वा वाढदिवस होता. बॅस्टिलच्या विध्वंसाचा तो १५० वा वाढदिवस होता. कुणाहि फ्रेंच माणसाला १४ जुलै म्हणावें. नाचाचें संगीत उमटतें, आणि युरोपिअन लोकांचीं शरीरें आपोआप नाचूं लचकूं लागतात. १४ जुलै या शब्दाची जादू या संगीतासारखी आहे. रस्त्यारस्त्यांतून, गल्ल्यांतून, दुकानांतून, काफेज़मधून, सगळीकडे पॅरिस दिवसभर नाचत होते. फ्रेंच मर्यांचा पूर – हास्याचा, आनंदाचा, प्रीतीचा प्रचंड कल्लोळ – सुंदर इमारती, सुंदर युवती, सुंदर पोषाक, सुंदर रस्ते, सुंदर देखावे – सगळें कांहीं भारी मनोहर. वेड लावून सोडणारे दोनच आठवडे जेमतेम झाले असतील. तसेंच, जिनोव्हा. मानवी उलाढालींची ती युरोपांत दिसणारी प्रचंड उंची माझ्या डोळ्यासमोर येई.

# रणांगण

सगळीं शहरें दिसतात. पण बर्लिन मी पाहिलें नाहीं. तरी तेंच नांव पुन्हा पुन्हा डोळ्यासमोर येतें. हॅर्टा बर्लिनची होती. समोरची मुंबई मी दृष्टीआड करतों. डोकें उशीवर ठेवतों. या असीम वेदनेच्या कळा केव्हां बरें ओसरतील ?

कशाचें बरें एवढें हें दुःख ? हॅर्टाच्या प्रीतीचें ? तिच्या वियोगाचें ? असेल. पण माझें मन कच्चें नाहीं. वियोगाचे, चिरवियोगाचे तडाखे मी सोसले आहेत. त्यापेक्षांहि भयंकर मैत्रीच्या ऊबदार शेकोट्या पेटलेल्या पाहिल्या आहेत. तशा त्या विझून त्यांची उदासीनतेंत राख झालेली मीं बघितली आहे. प्रीतीची जखम वाघिणीच्या चाव्यासारखी असते म्हणतात. बारंवार तिचें तोंड उघडतें. पण याहि जखमा माझ्या अंगावर आहेत. तरी मी धडधाकट आहें. पण हें ताजें दुःख अपार वाटतें. त्यांतून मुक्त होईन का ? हॅर्टानें आत्महत्या केली– होय. तुम्हांला मी सांगितलें का ? आज सकाळच्या टाईम्समध्यें मी वाचलें. कोपऱ्यांत कुठेंतरी हॉंगकॉंगची तार आहे. ज्या बोटीवरून मी आलों त्या बोटीवरचा एक प्रवासी फ्राऊलाईन हॅर्टा व्हॅन हिनें समुद्रांत उडी टाकून आत्महत्त्या केली. मुंबईहून बोट गेली त्याच रात्रीं. कारण बातमीदाराला कळलें नाहीं. मला एकदां वाटतें आपल्याला कारण कळलें आहे. पुन्हा वाटतें, छे तें कळलें नाहीं.

मुंबईत मी दोन दिवस आहे. अजून बाहेर गेलों नाहीं. कुणाला भेटलों नाहीं. खोलींत माझें सामान तसेंच पडलें आहे. अंगावर पोषाक होता तसाच आहे. त्यांतच मी झोंपतों. आज सकाळीं बाहेर पडणार होतों. आतां तेंहि सुचत नाहीं. समोरच टाईम्सचा अंक आहे. एक हॉंगकॉंगची आत्महत्त्येची बातमी. दुसरी बर्लिनमधें हेर नॉवॉर या जर्मन गृहस्थाची. त्याला तीन वर्षांची शिक्षा झाली. तिसरी बर्लिनमधल्याच कार्ल फ्रांझ या जर्मन तरुणाची. त्याचा मृत देह शहराबाहेरच्या एका राईत आढळला. हीं नांवें माझ्या माहितीचीं आहेत. फ्रांझ, हॅर्टाचा प्रियकर होता. नॉवॉर एका जर्मन कंपनीचा मॅनेजर होता. तीतच हॅर्टा असिस्टंट मॅनेजर होती. आणि—

पण सगळें एकदम आठवतें. अकरा दिवस अनेकांचीं आयुष्यें, त्याचे इतिहास, पुढचें भविष्य आणि आज हॅर्टाची आत्महत्या. वेदनेचे, त्वेषाचे डोंब उसळतात. मस्तक बधिर होतें. दुःखाच्या या घावांनीं शक्ति गळून जाते. त्वेष उकाळतो तेव्हां वाटतें, उठावें, बंड करून उठावें ! पण मी एकटा ! एका झाडाच्या हालचालीनें झंझावात सुटतात का ?

हें दुःख थोडें हलकें व्हावें म्हणून हें लिहिण्याचा यत्न करतों आहे. पण कसे ल्याह्यचें ? सुरवात कुठें ? शेवट कुठें ? क्रमानें शेवटीं सांगायचें तें आधींच सांगतों आहे असें वाटतें. माझें जगच तात्पुरतें उलटें झाले आहे. आरंभ, अंत, दिशांचा अनुक्रम, सगळं उलटल्यासारखं वाटतं. जरा शांत होऊन सांगेन म्हणतों.

## —४—

ऑगस्ट महिना उजाडला. आकाश गडद निळें झालें. त्यांत ताज्या उन्हाचें पिवळें तेज मिसळलें. त्या मिश्रणानें बनलेल्या गार हिरवळीचे हिरवेपण फ्रान्सच्या भूमीवर सगळीकडे पसरलें होतें. त्या देखाव्यानें चक्रधराचें भान हरपलें.

पांचच्या सुमारास रोम एक्स्प्रेस पॅरिसहून निघाली. दुसऱ्या वर्गांत एका खिडकीशीं चक्रधर बसला होता. पॅरिसमध्यें घालविलेल्या बेसुमार चैनीच्या आठ रात्री. त्यामुळें त्याचें मन अजून तडतडत होतें. त्यानें परिचारकाला बोलाविलें. शँपेन मागविली. अर्ध्या तासांतच त्याचें मन स्थिरावलें. त्याची अनिमिष दृष्टि बाहेर दिसणाऱ्या फ्रान्सचा निरोप घेत होती.

गाडी उपनगरांतून बाहेर पडली. घरें ठेंगणी झालीं. नंतर विरळ दिसूं लागलीं. थोड्याच वेळांत त्यांच्या आठवणीहि बुझल्या. कुरणें, शेतें आणि वेड लावणारी हिरवळ यांची रेलचेल उडाली. मध्येंच डाव्या बाजूला कालवा जवळ येई. त्याचीं धरणें दिसत. लहानशा होड्यांतून एखादा गुलहौशी मासेमारी करीत निश्चिंत बसलेला दिसे. उन्हाच्या तिरिपी कांठच्या रानांत सावल्याशीं पाठशिवण खेळत होत्या. लहानशी पायवाट कालव्याच्याच मार्गानें चालली होती. त्यावर सावकाश रेंगाळणारीं जोडपीं दिसत.

# रणांगण

सगळें चित्रासारखें दिसत होतें. त्यावर कसली कृष्णछाया असेल असें वाटलें असतें का ? पण एक लहानसें स्टेशन गेलें आणि मागोमाग गाडीच्या अगदीं जवळून गेलेलें असंख्य थडग्यांचें स्मशान सुरू झालें !

चक्रधरनें समोरच्या प्रवाशाला विचारलें, " ही सिमिटरी बरीच जुनी आहे का ? " त्यानें मान हलवून उत्तर दिले, " जुनी कसली ? या गेल्या युद्धाच्या फ्रान्सला मिळालेल्या देणग्या आहेत ! "

मृत्यूच्या हिंवाळ्यानें पसरलेलें तें पांढरें शुभ्र बर्फ होतें !

त्याचा विस्तार आटपेना. सुंदर नक्शीचे पांढरे शुभ्र दगड. मृत्यूनें पंचवीस वर्षांपूर्वीं झोडलेल्या मेजवानीची ती रांगोळी उरली होती ! चक्रधराचें मन थरारलें. सिमिटरीजवळ कितीतरी सुंदर काव्यें त्यानें वाचली होती. वेस्टमिनिस्टरमध्यें इंग्लंडच्या राष्ट्रपुरुषांची स्मशानभूमि आहे. पृथ्वीच्या कुठल्याहि शेतांत इतकी अमोल पेरणी झालेली नसेल, असें इंग्रजी कवि अभिमानानें म्हणतात. फ्रान्सच्या रक्षणासाठी गारद झालेल्या फ्रेंच सैनिकांची हीं सगळीं थडगीं.

इतक्या सुंदर हिरवळीचें क्षणांत रणांगण झालें ! सुखभोगांच्या विलासांत दंग असलेल्या फ्रान्समधें सुद्धां आगामी युद्धाची चाहूल ऐकूं येत होती !

त्याला फ्रेंच येत नव्हतें. पॅरिसमध्यें वर्तमानपत्रें वाचतां येत नसत. साक्षेपानें इंग्रजी वर्तमानपत्रें मिळविण्याची खटपट त्यानें केली नाहीं. राष्ट्राराष्ट्रांतून द्वेषाचे डोंब उसळत होते. त्याला दाद नव्हती. पण कुठेंहि गेलें तरी एखादी गोष्ट तरी अशी घडे. त्याच्या प्रत्ययाला येई, हे देश थडग्यांतून नुकते उठले आहेत, पुन्हा थडग्यांत कोसळूं पहात आहेत !

सगळीकडे याचा प्रत्यय येई . पण विलासांच्या जागांतूनसुद्धां तो यावा हें नवल नव्हे का ?

—५—

आदल्या रात्रीची गोष्ट. एकाचा सुमार होता. रुदब्लांदेमधल्या एका नाचघरासमोर चक्रधर मोटरमधून उतरला. तो फूटपाथवर आला. त्यानें दारांतून डोकावून पाहिलें. शेपन्नास जोडप्यांचा गोंधळ चालू होता. उत्तेजित झालेलें मन सावरावें म्हणून त्यानें सिगरेटची पेटी काढली. लायटर शिलगावयाला सुरवात केली. तो कांहीं केल्या पेटेना.

रात्र उबदार होती. रस्ता शांत होता. इतक्यांत अगदीं जवळून कुणी हांक मारली, 'मशूर.' त्यानें वळून पाहिलें. त्याच्याजवळ एक स्त्री उभी होती. रात्रीच्या पोटीं स्त्रियांचें वय लपविण्याची जादू असते! स्थूल शरीर, भुकेलेले डोळे, रंगलेले ओठ, लाली चढविलेला चेहेरा. एवढेंच त्याला दिसलें. तिनें म्हटलें, "मशूर, तुम्ही कुठचे?" चक्रधरानें उत्तर दिलें, "मी इजिप्शिअन आहे!" तिनें आनंदानें खांदे उडवले व म्हटलें, "इजिप्शिअन म्हणजे सगळ्या जगांतला जुना मानववंश आणि अजून जीवंत आहेत! हिंदी लोकांसारखे नामशेष झालेले नाहींत!"

चक्रधरला आश्चर्य वाटलें. त्यानें सिगरेट पुढें केली, ती घेऊन तिनें पुढें म्हटलें, "मला तहान लागली आहे. आपण कुठें दारू पिऊं या का?"

त्याची खात्रीच पटली. ती नायकीण होती. त्यानें विचारले, "माझ्याबरोबर चलतेस?" तिनें आनंदानें म्हटलें, "इजिप्तचा विजय असो!" तिनें पुढें म्हटलें, "माझ्या युनिअनचा दर आहे. मला ठराविकच पैसे घेतले पाहिजेत! पण चला तर. पैशाचें पुढें पाहूं!"

दोघेंहि मोटारीकडे वळलीं. वळसा घालून जातांना मोटारच्या दिव्याचा प्रकाश तिच्या चेहेऱ्यावर पडला. एकदम दार उघडलें. चक्रधरचा वाटाड्या ड्रायव्हर बाहेर उतरला. त्यानें चक्रधरला म्हटलें, "मशूर, हें काय? ही म्हातारी आहे!"

## र णां ग ण

तिनें त्याला चिमटा घेतला व म्हटलें, " तोंड संभाळ ! " पण तिला झिडकारून त्यानें म्हटलें, " चल निघ. म्हातारीला नेऊन काय जाळायचे आहे ? साहेबांना सुंदर तरुण पोरीचें प्रेम पाहिजे ! "

ती मोठ्यानें हंसली व म्हणाली, " मेल्या आज उद्यां लढाई होणार ! दोन महिन्यांनीं कदाचित तूं मेलेलासुद्धां असशील ! या दिवसांत का कुठं प्रेम मिळतं ? प्रेम सुस्थित जीवनांत जगतं, रणांगणावर नाही जगत ! "

चक्रधरानें लक्षपूर्वक तिच्याकडे पाहिलें. विचारले, " तूं इंग्रजी छान बोलतेस ! " " मी इंग्लिश आहे मशूर. कॅसॅनोव्हा काय म्हणतो ठाऊक आहे ना तुम्हाला ? प्रीतीच्या खेळांत पंचेंद्रियें साहाय्याला हवीत ! " ती हंसली, आंत बसली आणि चक्रधरला आंत घेऊन तिनें ड्रायव्हरला म्हटलें, " चल रे गुलामा ! "

लॅटिन क्वॉर्टरमधल्या एका हॉटेलांत चक्रधर तिला घेऊन गेला. तिची टकळी चालूच होती. पण त्यानें मुकाट्यानें खोलीचें दार उघडलें. दिवा लावला. खुर्ची तिच्यापुढें ओढली. आणि आलमारीतून दारू काढून दोन पेले भरले. तिच्यापुढें पेला करीत त्यानें विचारलें, " तूं किती वेळ राहूं शकशील इथं ? "

तिनें एक घोट घेतला व म्हटलें, " नायकिणीला एक रात्र म्हणजे एक जन्म असतो. हा जन्म तुम्हाला वाहिला आहे असें समजा ! "

तिनें दारू संपविली. पेला खालीं ठेवला. डोक्यावरची हॅट काढली आणि त्याच्याकडे पाठ करून म्हणाली, " ही पाठीवरची बटणें काढून देतां का ? "

त्यानें तिला खुर्चीवर बसविलें. नंतर समोरची खिडकी उघडली. पडदा सारला. तिथेंच उभा राहून तो तिला म्हणाला, " मला फक्त तुझी हकीकत ऐकायची आहे ! "

तिला खूप हंसू आलें. त्यानें त्रासून म्हटलें, " हंसायला काय झालें ? " तिनें थांबून उत्तर दिलें, " तुम्ही नवीन दिसतां अजून. नायकिणीकडे जाण्याची वृत्ति उत्पन्न होते तेव्हां माणूस स्वतःशीं ढोंग करूं लागतो. मनां-

तला उद्देश लपवून ठेवायचा आणि स्वतःची समजूत घालायची. आपल्याला फक्त नायकिणीची खरोखर स्थिति काय असते तें बघायचं आहे, जमल्यास एखादीचा उद्धारसुद्धां करायचा आहे ! ”

तो चिडतो आहे असें पाहून तिनें म्हटलें, “ त्रासूं नका. ‘ फक्त ’ म्हणालांत त्याचें हंसू आलें. पण पैसे घेतल्याशिवाय मी जाणार नाहीं आं ? ”

तिच्या लाडिक आविर्भावाची त्याला किळस आली. आतां तिचा चेहरा त्याला स्पष्ट दिसला. फुगलेल्या गालामुळें डोळे लपलेले, हनुवटीवर दोन घड्या पडल्या होत्या. बेसुमार रंगविलेले ओठ आणि मध्येंच बाहेर येणारी जीभ ! असल्या ओठांना वहात्या जखमेच्या तोंडाची उपमा दिलेली एकदां वाचल्याचें त्याला आठवलें !

त्याला चीड आली. पाटलोणीच्या खिशांतून शंभर फ्रँकची नोट त्यानें काढली. ती समोरच्या पलंगावर फेंकली व म्हटलें, “ चल नीघ. घे तुझा युनिअनचा दर. तुझ्या बोलण्याला भुलून तुला मी इथं आणलं, थेरड्या रूपामुळं नव्हे. ”

नंतर थोड्या वेळानें तिनें आपली हकीकत सांगितली.

ती म्हणाली, “ मी इंग्लिश आहें. फ्रान्सच्या भूमीवर नायकीण झालं. इथंच आतां राहतें. कारण इंग्लंडमधें कायद्याचा त्रास होतो. तिथं धंदा करूं देत नाहीत.

मी सोळा वर्षाची होतें. चवदा सालीं युद्ध सुरू झालं. फ्रान्समधेंच खरी धुमश्चक्री उडाली. हजारोंनीं लाखोंनी सैनिक फ्रान्समधें येत. मारले जात. लढाईंत प्रत्येक हल्ल्याच्या आधीं सैनिकांना रम पाजतात. लढाईच्या दिवसांत स्त्रीचा उपयोग सुद्धां मरणाआधीं क्षणिक मोक्षाचा अनुभव देणाऱ्या धुंदीचें साधन एवढाच असतो.

जिवावर उदार झालेले सगळे पुरुष. सगळे तरुण. अत्याचारांना ऊत आला. बेल्जममधें स्त्रियांवर जर्मनांनीं केले नसतील इतके अनाचार फ्रान्समधें आपखुषीनें होऊं लागले. एक वर्षांत फ्रान्समधें हजारोंनीं अनौरस

प्रजेची वाढ झाली. त्यांच्या बापांचा ठावठिकाणा नव्हता. चहूंकडे डोंब पेटलेला. मनें भ्रमिष्टासारखीं झालेलीं. असं झालं नसतं तरच आश्चर्य.

शेवटीं श्रीमंतांच्या घरांच्या भिंती ढासळायची पाळी आली. सरकार घाबरून गेलं. इंग्रजी सैनिक. सैन्यांची सारखी भरती येत होती. सगळीकडे लष्करी कायदा. उद्यां मरायला निघालेल्या त्या सैनिकांना कोणत्या शिक्षेचं भय वाटणार होतं ?

मी इंग्लंडमधें होतें. घरीं कोणी नाहीं. हॉटेलांत वाढपिणीचं काम करी. माझा प्रियकर लढाईवर गेला होता. त्याचीं पत्रं, एवढंच माझं आयुष्यांतलं निम्मं सुख होतं.

आम्ही फ्रान्समधें कसे आलों कुणास ठाऊक ? बातम्या उठूं लागल्या. फ्रान्समधें सैनिकासाठीं तरुण पोरी पुरवल्या जात आहेत ! खरं खोटं कुणास ठाऊक ? आमच्या हॉटेलांतल्या तरुण होत्या त्या सगळ्या त्यांत होत्या. बोट आमच्यासारख्या मुलींनीच भरलेली होती.

फ्रान्सला आलों. थोड्याच दिवसांत मी नायकीण झालें !

गर्दीच्या जागीं आंत शिरण्यासाठीं माणसाच्या रांगा लागतात तशी आमच्या खोलीबाहेर रांग लागे. मोठाले दिवाणखाने असत. साधे अडोशाचे पडदे असत. त्याच खोल्या. सैनिक येत. दारू प्यालेले, झिंगलेले, काय करतों आहे याची शुद्ध नसलेले. दुसऱ्या दारानें बाहेर पडत. वीस पंचवीस जण येऊन गेले म्हणजे नवीन मुली येत.

आतां त्याचं कांहीं वाटत नाहीं. त्यावेळीं विचित्र विचार येत. एखाद वेळीं वाटे, आपण इंग्लंडसाठी हें करतों आहों ! युद्ध संपलं म्हणजे इंग्लंड याची भरपाई करील. तरुण तरुण मुलें. त्यांचा उत्साह अनिवार असे. मरणाची तयारी दिसे. मन पुष्कळदां कुणाकडे ओढ घेई ! पण कशालाच वेळ नव्हता.

युद्ध संपलं. मी इंग्लंडला परत गेलें. पण आतां मी नायकीण झालें होतें. मला समाजांत जागा नव्हती. काम मिळण्यासारखं नव्हतं. एकच धंदा होता तो करायला लागलें.

दोन वर्षांनीं एकदां मी पकडली गेलें तेव्हां मला कळलं कीं इंग्लंडमध्यें नायकिणींना कायद्यानें बंदी आहे ! मी थोड्या शिक्षेवर सुटलें. आतां तरबेज झालें होतें. पुन्हां धंदा आरंभला. पुन्हां धंदा पुन्हां शिक्षा, असं किती तरी झालं. वय होतं तेव्हां कसं तरी चाले. रूप ओसरल्यावर कोण विचारतो ? पोटाची पंचाईत पडायला लागली. लंडनमध्यें धंदा चालेना. आडगांवला जावं म्हणून लिव्हरपूलकडे गेलें.

परवांच एक खटला झाला. तुम्ही वाचला असेल. शस्त्राच्या कारखान्यांतील रहस्यं एका इंग्लिश बेकारानें जर्मन हेरांना तीस पौंडास विकली ! तो स्कॉच होता. मागच्या लढाईत जखमी, निकामी झाला होता. गेली २० वर्षे त्याची बेकारीत गेली. शेवटीं मोहाला बळी पडून, एकदां इंग्लंडसाठीं जर्मनांविरुद्ध लढलेल्या त्या माणसानें इंग्रजी कारखान्यांची रहस्यं जर्मनांना विकली !

पण मला भीति वाटली ती निराळ्याच कारणानें. वर्तमानपत्रांतून स्कॉच माणसानें देशद्रोह केला असे मथळे आले. लोक बोलूं लागले, हे घरबुडवे आहेत. आज आयरिशांविषयीं इंग्लंडमधें द्वेष आहे. यहुद्यांविषयीं जर्मनींत आहे. तसंच पुढं स्कॉचचं व्हायचं ! मी मुळची स्कॉच. माझ्या मार्गात ही जर्मन हेरगिरीची जाळी पुष्कळदां पसरली होती. सगळी पापं झाली. त्यांत हें देशद्रोहाचं नको. असें वाटून मी पॅरीसला आलें. इथं सुखानें पोट भरतें. इथें कायद्याची काचणी नाहीं."

—६—

अंधार पडला. जेवणाची वेळ होत आली. कॉरिडॉरमधून लहानशी घंटी वाजवीत जेवण तयार आहे असें ओरडत परिचारक गेला. चक्रधर भानावर आला. त्याच्या डब्याचें दार उघडलें. एक हिंदी मुलगी आंत आली. तिनें एकदम चपापून म्हटलें, " माफ करा अं. मी डबा चुकलं " आणि ती वळली.

चक्रधर उठला. किती काळी दिसली ती त्याला ! आणि त्यांत तिनें ओंठ रंगविले होते ! त्या विद्रूपपणानें त्याला लहानपणीं ऐकलेल्या गोष्टींतल्या मुलें खाणाऱ्या लावेची आठवण झाली ! तिच्या मागोमागच लतीफ आंत आला आणि म्हणाला, " उठा उठा. जेवायला चलतां ना ? "

चक्रधरनें त्याच्याकडे बघून म्हटलें, " तुम्ही या काळ्या पोरींच्याहि मागें आहांत वाटतं ! " त्यानें हंसून उत्तर दिलें, " बाबा माझा दलालाचा धंदा आहे ! दलाली कोळशाचीहि करतों ! आणि सोन्याचीहि करतों. चल जेवायला चल ! "

दोघेहि जेवणाच्या डब्याकडे गेले.

अबदुल लतीफ म्हणजे एक वल्ली होती. मेथा आणि कंपनीचे लंडनमध्यें ईस्ट–सेंट्रलमधल्या एका आडरस्त्याला export import चें दुकान आहे. तिथें लतीफला प्रथम चक्रधरनें पाहिलें. इंग्लंड सोडतांना मेथाचा निरोप घ्यायला चक्रधर गेला. बोळकंडीतल्या चाळीवजा इमारतींत तो जिना चढत होता. त्यावेळीं विचार चालू होते, मेथाला पॅरिसपर्यंत बरोबर न्यावें. त्यानें अखेरचें दार उघडलें व एकदम म्हटलें, " मेथा तूं कबूल केलं होतंस एकदां पॅरिसला यायचं–" पण मेथाच्या आविर्भावानें तो एकदम थांबला. त्याला बसवून घेऊन मेथानें शेजारी बोट दाखवून हलक्या आवाजांत म्हटलें, " जरा थांब. अँटवर्पेशीं बोलताहेत. आपण मग बोलूं."

टेलिफोनवर घाईघाईनें लतीफच फ्रेंचमधें बोलत होता. त्याचें वय सांगणें कठिण होतें. काळसर डोळे, अस्सल इजिप्शिअन कांति, अंगांत उंची सूट. त्याचें बोलणें संपल्यावर मेथानें त्याची ओळख करून दिली, व म्हटलें, " तुला सोबतच पाहिजे ना ? मी इथून हलूं शकत नाही. पण हे पॅरिसला जाणार आहेत. वाटल्यास तुला जिनोव्हापर्यंत सुद्धां पोचवतील."

लतीफनें विचारलें, " तुम्ही परत हिंदुस्थानला निघालांत ? " मेथानें हंसून म्हटलें, " होय, लढाई होणार म्हणून घाबरला आहे." चक्रधरनें उत्तर दिलें, " तुझं ठीक आहे बाबा. गोरी बायको आहे. घरदार इथंच आहे. तुला लढाई झाली काय नि न झाली काय ! "

मेथानें लतीफकडे बघत म्हटलें, " जीव कुणाला नकोसा झाला आहे होय ? लढाई होणारच असं यांनीं नक्कीं सांगितलं कीं मीसुद्धां अमेरिकेला पळणार ! "

" हे जर्मनीचे परराष्ट्रमंत्री होणार आहेत वाटतं ! "

मेथानें मिस्किलपणें म्हटलें, " त्यापेक्षांहि मोठे. हे शस्त्रांच्या कारखान्या-तले माल विकणारे दलाल आहेत. लढाई होत नसली तरी घडवून आणणं यांच्या हातीं आहे. "

लतीफनें सिगरेट पेटविली व धूर सोडीत म्हटलें, " मेथा थट्टा करतो आहेस अं ? पण ही गोष्ट खोटी नाहीं. माल सांठला कीं उठविलाच पाहिजे. जीं राष्ट्रं तो विकत घेतात त्यांना तो खपवून टाकलाच पाहिजे. तोफा दारू गोळे खपायचे म्हणजे लढाई व्हायलाच पाहिजे. जास्त नफा व्हावा म्हणून लढाई चालू ठेवायला पाहिजे. धंद्यातलं तत्त्वच आहे. धंदे चालविले नाहीत तर देशांतली भरभराट कमी होईल. माणसं मरतील ! "

चक्रधरनें हंसून म्हटलं, " होय, तुमचे कारखाने चालत राहिले म्हणजे शेवटी जीवंत राहतील ते फक्त दलाल आणि कारखान्यांचे मालक ? "

या सगळ्या बोलण्यांत तथ्य असो वा नसो. शस्त्रांचे कारखान्यांचे चालकच युद्धें घडवून आणतात, ही लोकांची समजूत इतकी पक्की झाली आहे कीं अमेरिकेनें सगळ्या कारखान्यांच्या व्यवहाराची सरकारी चौकशी करविली होती. ब्रिटनमध्यें एक रॉयल कमिशनहि नेमलें गेलें होतें. हे कारखाने राष्ट्रीय मालकीचेच असावेत असें म्हणणारे लोक आहेत. पण शस्त्रांचे कारखाने सरकारी मालकीचे झाले तरी काय होणार ? नफेबाजीची चटक सर्वत्र बोकाळली आहे. युद्धाची पर्वणी सुलभ, श्रीमंतीला फार चांगली आहे. गेल्या युद्धांत ज्यूंनीं जर्मनीला जें जें केलें त्यापैकीं कांहींहि करायची बाकी इंग्लंडमधल्या, फ्रान्समधल्या किंवा इतर दोस्तराष्ट्रां-पैकीं कुठल्याहि नफेबाजांनीं ठेवली नव्हती.

तिघेहि उठले. चहा घ्यायला गेले. मेथानें चक्रधरला सांगितलें, "तुला इतकी छान सोबत पॅरिसमध्यें दिली आहे याबद्दल माझे आभार मान. यांची दुसरी

दलाली तुला सांगतों. पण ती अगदीं खाजगी अं. गोऱ्या पोरी जगभर विकण्याचा. कॅबरेज, थेटरें, नाचघरें, कुंटणखाने सगळीकडे पुरविण्याचा एक व्यापार चालतो. White slave traffic म्हणून. त्याच्याशीं यांचा जवळचा दूरचा थोडा संबंध आहे."

जेवण संपलें. कॉफीचे पेले आले. लतीफनें चिरूट शिलगावीत म्हटलें, " I am very happy. लहानपणीं गरीब होतों तेव्हां श्रीमंत होण्याची शर्यत लावली. आतां लढाई होणार हें निश्चित. एक लढाई झाली तर बेसिल झाराफपेक्षांहि मी श्रीमंत होऊन दाखवीन ! "

चक्रधरनें म्हटलें, " झाराफचें नांव मी ऐकलें नाही. कोण हा ? "

तो हंसला. मी विचारलें, " हंसता कां ?" त्याची नजर थोडी अंतर्मुख झाल्यासारखी झाली. तो म्हणाला, " शस्त्रांच्या कारखान्यांचे व्यवहार संशयास्पद असतात. त्यांची चौकशी करण्यासाठीं इंग्लंडमध्यें रॉयल कमिशन नेमलें होतें. व्हायकर्स हा जगांतला युद्धोपयोगी सामुग्रीचा सगळ्यांत मोठा कारखाना. त्याच्या मुख्य डायरेक्टरांची साक्ष होती. एका सभासदानें विचारलें, ' सर बेसिल झाराफचे तुमचे कांहीं व्यवहार आहेत का ? ' साक्षीदारानें उत्तर दिलें, ' झाराफचे नांव मी ऐकले नाहीं. कोण हा ! ' त्याची मला आठवण झाली. "

सर बेसिल झाराफ हा शस्त्रसामुग्री विकणारा जगांतला सगळ्यांत मोठा दलाल. त्यानें अलोट संपत्ति मिळविली. कुठल्याहि राष्ट्राच्या सरकारांत त्याची खास वर्णी असेल. त्याच्या खेपा सुरू झाल्या म्हणजे थोड्याच दिवसांत युद्धें सुरू होणार अशीं भाकितें होत. तीं बहुधा खरीं ठरत. मँचुकिओ, चीन, अबिसीनीया, सगळ्या लढायांची सुरवात असल्या दलालांच्या खेपांनींच झाली होती.

चक्रधरनें चिडून म्हटलें, " I hate this business of war ! " लतीफनें उत्तर दिलें, " Oh ! It is a lovely business ! लढाईचा राग येतो म्हणतोय ? युद्ध नाहीं कुठं ? सध्यां शांतता आहे ना ? पण तोफांचे

आवाज ऐकूं येत नाहींत म्हणून सगळं व्यवस्थित चाललं आहे असं तुम्ही समजतां का ? My dear fellow, All is War under Mask ! ”

सकाळीं मॉदान फ्रॉंटिअरवर गाडी आली. ही फ्रान्सची सरहद्द. बोलघेवडे हंसतमुख फ्रेंच लोक, त्यांचीं टुमदार घरें, पाळर झाडांच्या रांगा, सगळ्यांचें हें शेवटचें दर्शन. स्टेशनचा पोर्टर असो, मास्तर असो, पोलीस असो, सगळ्यांच्या वागणुकींत सहजपणा, मोकळेपणा. मोठ्यानें बोलणें, वारंवार उडणारे खांदे, पुन्हा पुन्हा उठणारे हास्यध्वनि, Pardieu monseign–eur, merci mademoiselle, गोड फ्रेंच भाषेचीं किलबिलें, अर्ध्या तासांत सगळें मागें पडलं. गाडी इटलींत शिरली. इटली सुंदर आहे, पण फ्रान्सपेक्षां गरीब. सृष्टीचें वैभव मोठें पण माणसाची वस्ती जुनाट, बुरसटलेली. स्टेशनांत गाडी उभी होती. भोंवताली आल्पसच्या रांगा. त्यांच्या शिखरावरून बर्फ. मागच्या बाजूला सुंदर ओढा वहात होता. टुमदार पण जुनीं पडकीं घरें. खुजे लोक. वनश्री फुललेली, पण जागोजाग जाहिरातीच्या पाट्या. त्या पाट्यांवरून मुसोलिनीच्या सहीचे संदेश लिहिलेले. लोक भेटले म्हणजे हात उचलीत. फॅसिस्ट सलाम देत.

फ्रान्समध्यें त्याला भाषा समजत नव्हती. आणि इथेंहि तोच प्रश्न. पण फ्रान्समध्यें त्याला मोकळें वाटे. इथें जखडल्यासारखें वाटूं लागलें. फ्रॉंटिअरच्या स्टेशनवरच त्याला त्याचा अनुभव आला. सकाळचे ५–६ वाजले असतील. चार तासांनीं तो जिनोव्हाला पोंचणार होता. आणि सहा तासांच्या आंत हिंदुस्थानच्या बोटीवर. सामानावर बोटीचीं लेबलें होती. पण त्याचें सामान कसोशीनें तपासलें गेलें. अधिकाऱ्यांची भाषा त्याला समजेना. वागण्यांत असभ्यपणा, उद्दामपणा नव्हता. पण दृष्टींत संशय स्पष्ट दिसे. त्याच्याजवळ इटलीच्या मित्रराष्ट्रांचा पासपोर्ट नव्हता. इंग्लंडचा होता. जिकडे तिकडे हाच संशय. लोकांत युद्धाच्या संभवाची चर्चा चालू होती. बाहेर, झाडावरून, घरावरून, तारेच्या खांबावरून, शेतांतून मुसोलिनीच्या सह्यांचे संदेश उभारलेले. मध्येंच एखाद्या शेतांत एखादा म्हातारा गवत कापतांना दिसे.

गवताचे लहान लहान ढीग रांगेनें मांडलेले दिसत. तेवढ्यापुरता या संशयाच्या, insecurityच्या वातावरणाचा विसर पडे. एरव्हीं सगळीकडे तीच तऱ्हा.

यूरोप सगळें गोरें आहे. इटालिअन्सच फक्त सांवळे असतील. त्यांचे केंसहि आपल्यासारखेच काळे. डोळेहि तसेच. सिसिलींतल्या बायका तर हिंदी स्त्रियांसारख्याच दिसतात. पण फ्रान्स किंवा इंग्लंडपेक्षां इटलींत त्याला अस्वस्थ वाटे. हळू हळू गाडी आल्प्स उतरली. समुद्रपातळीशीं आली. जिनो-व्हाला येऊन पोंचली.

तो बोटीवर पोंचला तेव्हां दोन वाजले होते. लंचची वेळ टळून गेली होती. तीनला बोट सुटणार. पुन्हा बाहेर जायचें, कांहीं खाऊन यायचें, इतका वेळ नव्हता. त्यानें केबिन गांठली, कपडे काढले, थकून बिछान्यावर अंग टाकलें. त्याला झोप लागली. जागा झाला, तेव्हां जिनोव्हा सुटलें होतें. बोट जिनोव्हाच्या आखातांत होती. समुद्र शांत होता. त्याचें मनहि स्थिरावलें होतें. त्यानें मनांत म्हटलें, आतां दहा दिवस विश्रांति. विचार नाहींत. वादळें नाहींत. खायचें, फिरायचें, खेळायचें आणि हंसत हंसत मुंबईला उतरावयाचें.

—७—

चहाची घंटा नुकतीच झाली होती. मी जागा झालों. पोटांत कांहीं नव्हतें. लगबगीनें उठलों, उतरलों, तोंड धुतलें, केस विंचरले, टाय घातला, जॅकेट चढवलें आणि केबिनच्या बाहेर पडलों.

उष्मा मनस्वी होत होता. पानगृहांत तर कहर झाला होता. गर्दी, सिगारेटचा धूर; आणि पंखे मुळींच नाहींत. मी खालीं गेलों. जेवणाचा दिवाणखाना खालीं होता. एका मोठ्या टेबलावर बरीच हिंदी मंडळी होती. कांहींचा चहा संपत आला होता. कांहीं नुकते येत होते. खुर्ची ओढली. बशींतलें पातळ कागदाचें सर्व्हिएट मांडीवर पसरलें आणि परिचारकाला सांगितलें, चहा, ‘ दूध आणि साखर. ’

इतक्यांत माझ्या खांद्याला स्पर्श झाला. मी वळून पाहिलें. पंचविशींतला मराठा तरुण असावा. त्यानें हंसत हात पुढें केला. आणि ओळख करून देत म्हटलें, “ मी शिंदे. आपलं नांव काय ? ”

त्याच्याकडे पाहिल्याबरोबर मला बरें वाटलें. कांहींचे चेहेरेच असे असतात. पाहिल्याबरोबर स्नेह जमेलशी खात्री वाटते. मी माझी ओळख करून दिली. पलिकडे एक मुसलमान मुलगा होता. त्याचीहि ओळख झाली. हस्तांदोलन केलें आणि म्हटलें, “ मैं मन्नान हूं. आपली तारीफ ? ” मी माझें नांव सांगितलें. त्याबरोबर त्याच्या कपाळाला किंचित् सुरकुत्या पडल्या. तो म्हणाला, “ I am afraid, it is a bit difficult for me. How do you spell it ? ”

शिंदे चहा पीत होते ते एकदम मोठ्यानें हंसले आणि म्हणाले, “ कंटाळलों बुवा स्पेलिंगला. I hope you are not a German also. मघाशीं डेकवर उभा होतों. एक जर्मन शेजारीं होता. त्याला इंग्रजी शिकावयाचं आहे. जिवापाड धडपड चालली आहे त्याची. त्याच्याशीं

बोलणं म्हणजे मरण. कांहीं बोललें म्हणजे म्हणतो – आं काय म्हणालांत ? त्याचं स्पेलिंग काय ? अर्थ काय ?"

मी ब्रेड कापीत होतों. चाकूवर लोणी घेतलें आणि ब्रेडवर पसरीत म्हटलें, "I am glad you don't like Germans. I have a grudge against them too. आज पासपोर्टच्या वेळीं या जर्मनांच्या मुळेंच मी अर्धा मेला झालों."

शिंदे हंसून म्हणाले, "त्यांच्याजवळ उभं राहण्याची सोय नाहीं. लागलेच बोलायला. बोट सुटली तेव्हां मीं म्हटलं, Beautiful Genoa ! लगेच तो म्हणतो Beautiful म्हणजे काय ? आतां सुंदर म्हणजे काय सांगूं कपाळ ? आणि वर स्पेलिंग. अर्ध्या तासांत मी इतका त्रासलों ! चिडलों शेवटीं. एका खलाशानं पोरीकडे बघून वात्रटपणा केला थोडा, तेव्हां सहज म्हटलं, Impudent brute ! त्याबरोबर लगेच याची कागद पेन्सिल पुढें ! 'Brute म्हणजे काय ?' काय सांगायचं ? बोला ?"

मी हंसून म्हटलं, "तुम्ही काय सांगितलंत ?"

कागदानें तोंड पुशीत शिंदे म्हणाले, "मला कांहीं सुचेना आणि तो तर पिच्छा सोडीना. शेवटीं त्रासून मीं म्हटलं, Brute म्हणजे इटालिअन !" पण तो वर विचारतो, "काय इटालिअन ?" मी म्हटलें, "हो, किंवा जर्मन सुद्धां !"

सगळे मोठ्यानें हंसले. काट्याचमच्यांची किणकिण थांबत आली होती. चहा संपवून आम्ही उठलों. माझ्या मनांत जर्मनांचे विचार चालू होते.

पानगृह. सगळी गजबज. नव्या ओळखी. टेबलाटेबलापाशीं थवे. हिंदु मुसलमान, काळे गोरे, सगळे मिळून मिसळून बसलेले. हस्तांदोलनें, हंसणें, बोलणें, वादविवाद, सगळ्यांचा गोंधळ चालू होता. कुठें बीरचे ग्लास. कुठें बुद्धिबळें, ड्राइस किंवा पत्ते. अकरा दिवसांची वस्ती बोटीवर. कल्पनेंत ती नेहमीं सुंदर वाटते. पण सौंदर्याला एक मोठा शाप असतो. बहुधा त्याचा कंटाळा येतो. या कंटाळ्यांतून वांचायचें एवढीच प्रत्येकाची धडपड.

मी काउंटजवळ गेलों. स्ट्युअर्डला सिगारेट मागितली. डबा घेतला. पैशाऐवजीं पावतीवर माझी सही करून दिली. गर्दीतून वाट काढली. कोंपऱ्यांत एक टेबल होतें. तिथें वाऱ्याशीं बसावें म्हणून गेलों, बसलों, सिगारेट पेटविली आणि चहूंकडे नजर टाकली.

शंभरसवाशें प्रवासी असतील. निम्मे काळे आणि निम्मे गोरे. सगळ्यांचे पोषाख एका धर्तीचे. बूट, पाटलोण, शर्ट, टाईज्. माझ्या दृष्टीला हिंदी लोक ओळखूं येत : हा बंगाली, हा पंजाबी, हा मद्रासी. पण गोऱ्या कातडींत फरक कळेना. कांहीं तरुण पोरी, कांहीं प्रौढा, एक दोन म्हाताऱ्या. पुरुष होते तेहि तसेच. पण त्यांची जात देश ओळखतां येण्यासारखा नव्हता. समोरच एक मुलगी होती. सिगारेट ओढत होती. टपोरे डोळे, फुगीर गाल, गोरीपान, उंच कपाळ, भुरभुरणारे केंस ! डोळ्यांत लालसा दिसे. जीभ काढून धांवणाऱ्या वाघिणीसारखी. मनांत म्हटलें, ही बहुधा पोल असावी. इंग्रजी खास नव्हे. तिचें नांव मार्था हें पुढें कळलें.

शेजारच्या एका तरुणानें म्हटलें, " माफ करा. मी ॲशट्रे घेऊं का ? " मी माफी मागून ॲशट्रे पुढें सरकावला. बघत होतों त्या पोरीकडे. तो हंसून म्हणाला " She is a peach !– is'nt she ? " मी शरमलों नाही. मुशाफरांना शरमण्यासारखें कांहीं नसतें. मला ठाऊक होतें. विलायतेला गेलें म्हणजे एक विचित्र अनुभव येतो, नात्यागोत्याचीं, ओळखीची, समाज-संकेतांचीं दडपणें उडून जातात. जवळच्या मित्राजवळ आपण बोलूं शकणार नाही, असें वासनांचें, लालसेचें प्रदर्शन तिऱ्हाइताजवळ साहजिकपणें आपण करतों. जगण्याची गति प्रचंड, भोगांची संधि अमूप आणि वेळ थोडा. खोट्या संभावितपणाचे श्रम घेणें साधत नाहीं. सिगारेट केस उघडून मला सिगारेट देत तो म्हणाला, " कहिये, क्या राय है ? "

मी सिगारेट शिलगावली. त्याचा आशय मला समजला. त्या पोरीची शिकार करण्यासंबंधीं माझें मत त्याला पाहिजे होतें. मीं म्हटलें, " राय किस की ? बढते जाईए. आखिर मामला है तो दसहि दीन का ? "

दहा दिवसांचा प्रवास. सुखसोयींची चंगळ होती. खाणें, राहणे, पिणें, नाचणें. कमतरता एकाच गोष्टीची. स्त्रीची. तेवढी मिळाली कीं, प्रवास पूर्ण यशस्वी. असेंच सगळ्यांचें बघणें. तो मोठ्यानें हंसला व म्हणाला," भई आप तो वाकई शोकिन हो! कह सकतां हूं ये पंजाबकी जवानी है!" मी हंसलों, पण त्याला मी पंजाबी नाहीं हें सांगितलें नाहीं. यानंतर थोड्या गोष्टी झाल्या. तो सिंधी होता. मदनानी त्याचें नांव. मुलींतली एखादी मला पसंत पडली आहे कीं नाही असें त्यानें विचारलें. तेव्हां मी सांगितलें, मी थकलों आहे. दोन वर्षे युरोपांत होतों. येतांना पंधरा दिवस पॅरिसमध्यें. सगळी हौस तात्पुरती फिटली आहे. त्यानें जोरानें मान हलवून म्हटलें, "भई, ये हो नहि सकता. आप दर्दी हो. हमारी साथ करना होगा. बस इसीमे एखाद पसंत कर लो. उसके पिछे पडेंगे."

मी भोंवतालीं नजर टाकली. जो तो दंग होता. १०–१२ तरुणी असतील. कुणी हंसून शेजाऱ्याशीं बोलत होत्या. एक जण वारा घेत होती. लाउड स्पीकरमधून संगीत उमटत होतें. दोघीतिघी जागच्या जागी ताल धरीत होत्या, डुलत होत्या. त्यांचा मनोहर लचक, वेलावणाऱ्या माना, केंस मागें सारण्यासाठी चाललेली धडपड, सगळं पाहिलं. एकाहि मुलीकडे माझं चित्त गेलं नाहीं. मी माझ्या मित्राला म्हटलें, 'अखिर ये होती कौन है?' तो म्हणाला, "Oh! they are all Germans. But that is neither here nor there!"

मीं त्याला म्हटलें, "Excuse me. I'have a grudge against Germans. I don't fall for any of these girls."

त्यानंतर अर्ध्याच तासांत माझी एका जर्मनाशीं गट्टी झाली. मी पानगृहांत बसलों होतों. शिंदे मला शोधीत आले. मी सिगारेट पुढें केली. ते आभार-पूर्वक म्हणाले, "माफ करा. मी ओढीत नाहीं." माझ्याजवळ सुपारी होती. तीहि त्यांनीं नाकारली. मी चकित झालों. मुद्दामच म्हटलें, "कंटाळा आला आहे, थोडी व्हिस्की घेऊं या." ते हंसून म्हणाले, "मी आजारी असलें

तरच दारू घेतों ! " मी थक्क झालों. आश्चर्य लपविण्याचा प्रयत्न केला आणि म्हटलें, " म्हणजे विलायती पोरीशिवाय तुम्ही कशांत नाहीं म्हणतां ? " त्यावर मोठ्यानें हंसून ते म्हणाले, " विध्वंस, मी डॉक्टर आहे. साध्या हिंदी मनाला वाटणारें गोऱ्या कातडीचें आकर्षण मला शिल्लक उरलेलें नाहीं. "

गृहस्थ खोटें बोलत नव्हता. खोटें बोलण्याची गरज नव्हती तिथें. महाराष्ट्रीय मुलांची ही गंमत इंग्लंडमध्यें मी बरीच पाहिली आहे. कां कुणास कळे, त्यांच्या हातून अनाचार बराच कमी होतो. माझ्यासारखा एखादाच असेल. माझ्याजवळ पैसा होता. रसिकता होती. रसिकतेचा शेवट स्त्रीपूजेंत होतो. माझ्याहि रसिकतेचा कळस तसाच होई. शिवाय मी इंग्लंडला गेलों तों अशा मनस्थितींत – पण तें असो.

शिंदे खुषींत होते. मी म्हटलें, " आश्चर्य आहे. तुम्हांला कसली चटक नाही ? गुणांची गळचेपी करणारं इथलं वातावरण. तेंहि तुम्हाला वेडें करूं शकत नाहीं. आणि वर खुषींत आहां ! I envy you ! "

टेबलावर हात ठेवून ते वांकले. म्हणाले, " विध्वंस I have made a friend. I am very happy. तुमची ओळख करून देऊं ? चला. " मी विचारलें, " पण आहे कोण ? " " जर्मन. " मी मुद्दामच भुंवया वर चढवल्या आणि म्हटलें, " पण शिंदे, तुमच्या आमच्या स्नेहांत एकच गोष्ट होती. जर्मनांचा तिटकारा आणि आतां—"

त्यांनीं माझा हात धरला, ओढला आणि म्हटलें, " अहो, त्याला इंग्रजी शिकायचा तिटकारा आहे. जर्मनशिवाय दुसरं कांहीं नको. बघा तर "

त्यांचा हात धरून मी स्मोकिंग रूमच्या बाहेर पडलों.

—८—

बाहेर लिहिण्याचीं टेबलें ठेवलीं होतीं. त्यावर दोन पोरी पत्रें लिहित होत्या. भिंतीशीं आराम खुर्च्या होत्या. त्यावर एकदोघे डुलक्या घेत होते. पलिकडे जिने होते. प्रवासी वरखालीं जात होते. डाव्या हाताला मोठी

खिडकी होती. खिडकी कसली, दारच तें. भक्कम लोखंडी कवाडें. ती उघडून भिंतीला अडकविली होतीं. बाहेर भूमध्य समुद्र. बोटीनें कापलेलें पाणी उडे. त्याचा सुंदर फेंस उसळे. तुषार अंगावर येत. दाराला आडव्या गजांचा कठडा होता. शेजारीं एक तरुणी बसली होती. कृश मळका पोषाख. पिंजारलेले केंस. वेष गरिबीचा. कपड्यावर एक मूल चढत होतें, त्याचा निषेध करीत खालीं ओढीत ती हैराण झाल्यासारखी दिसत होती.

शिंद्यांनीं हांक मारली, ' लुई ! ' पण त्या बालकानें वळून पाहिलें नाहीं. लाटा उसळत खालीं जात. लहानग्या टेंकड्या तयार होत, नंतर खळगे. सारखें बघत राहिलें तर झोंपाळ्यावर बसल्यासारखें वाटावें आणि शेवटीं फुटत तेव्हां तर निळसर घोड्यांच्या तोंडचा फेंसच वाटावा ! त्या झोंपाळ्यावर लुई दंग होता. त्याच्या आईनें शिंद्याकडे बघितलें. हंसून स्वागत केलें आणि लुईला ओढून ती म्हणाली, " लुई ! लुई ! आँकल ! "

पण शिंदेकाकांची पर्वा लुईला नव्हती. तरी आँकल शब्दानें तो वळला. गोड चेहेऱ्यावर शक्य तितका निषेध दाखवीत तो म्हणाला, " Nien, Nien, no uncle ! Deutsch ? "

शिंद्यांनी माझ्याकडे वळून म्हटलें," पाहिलेंत, त्याला इंग्रजी अंकल नको आहे. डॉईश ( जर्मन ) शब्द पाहिजे आहे 'काका'ला." नंतर त्यांनीं त्याला उचललें.

लुईला शिंद्यांविषयीं सहानुभूति वाटली असावी. त्यानें शिंद्यांना दोन चपराका लगावल्या. गालाचा चावा घेतला आणि जर्मनमध्यें म्हटलें, " काका काका ! "

त्यानंतर तासभर मी शिंदे आणि लुई खूप खेळलों. त्याची भाषा आम्हाला समजेना आणि आमची त्याला. इंग्रजीचा त्याला तिटकारा आणि डॉइशचें आम्हांला वावडें.- करपल्लवी, नेत्रपल्लवी, प्रत्यक्ष वस्तुपाठ, हरतऱ्हा करायच्या ! अर्थ कळला कीं गंमत. न कळला तर त्यापेक्षांहि मौज. भिन्न देशचे आम्ही प्रवासी. पण आमचा स्नेह किती निरागस होता ! इतर प्रवाशांप्रमाणें आमच्या मैत्रींत, बोलण्यांत, खेळण्यांत, हंसण्यांत, अनुचित

अनुभवाची चर्चा नव्हती, किल्मिष नव्हतें, बौद्धिक विवादांचा अट्टाहास नव्हता, शीण नव्हता. डेकचे पांढरे शुभ्र कठडे, कौतुकानें खुर्च्यांवरून पहाणारे प्रवासी, त्याच्या बागडण्याकडे बघणाऱ्या स्त्रियांच्या वत्सल नजरा, पाण्याची गर्जना, फेंस आणि तुषार आणि त्यांतून उमटणारें लुईचें शीळेसारखें गोड, थोडें कर्कश पण अतिशय मोकळें हास्य! आठवण होते तेव्हां आज वेदना होते. माणसाला स्मृति हा शाप कीं विस्मृति हा वर आहे याचा क्षणभर विचार पडतो.

संध्याकाळपर्यंत आम्हा दोघांनाहि त्याचें वेड लागलें. तोहि दूर होईना. जेवणाची वेळ होत आली. मला कपडे करायचे होते. लुईला कडेवर घेतला. डेकवरून उतरलों. रस्त्यांत जो भेटे तो आमच्याशीं बोले. एरव्हीं ओळखी-शिवाय न बोलणाऱ्या बायका डोळ्यावर झांपणें लावल्यासारख्या सरळ बघत, सरळ जात. एखादी अँग्लो इंडियन बाई असायची. तिला तर हिंदी काळेपणा कांट्यासारखा टोंचायचा. पण त्यांतलीहि एक हंसली. मार्था आली. तिनें रस्त्यांत आम्हां दोघांनाहि अडवलें. लुईला घेण्याचा प्रयत्न केला. त्याला चिमटे घेतले, गुदगुल्या केल्या, ओढून बघितलें. पण लालसेनें न निथळलेलें त्याचें मन! गोडवेपणांत, सौंदर्यात तिच्या शतपट समृद्धि त्याची स्वतःची! त्यानें तिचा निषेध केला! माझ्या गळ्याची मिठी सोडली नाहीं. आणि ती पोरहि त्याला सोडीना. शेवटीं शिंद्यांनीं त्याला घेतलें; आणि मी त्याच्या दांडगाईमुळें अस्ताव्यस्त झालेला टाय नीट करायला लागलों. इतक्यांत माझ्या खांद्यावर मागून कुणी हात ठेवला. त्या मुलींच्या पाळतीवरचा मघाचा मदनानी, त्यानें माझा हात दाबीत म्हटलें, “That's the staff. You catch the child, the child catches the lovelies – for you!”

मला कसेंसेंच वाटलें. पण बोललों नाहीं. खालीं गेलों. शिंदे लुईच्या आईशीं बोलत होते. बिचारी आनंदांत होती. मी मागें बघितलें. जवळ मुख्य स्ट्युअर्ड उभा होता. त्यानें गळ्याचा ‘बो’ नीट केला. तोंड उघडल्यासारखें केलें आणि डोळे मिचकावले. मी त्याच्याकडे बघून विचारलें, “yes, steward?”

तो पुढें आला. शिंदे बोलत होते लुईजवळ. लुईला गुदगुदल्या करून तो हळूच त्यांना म्हणतो, " Good boy, better mummy, clever fellows you two. "

शिंदे रागानें लाल झाले. त्यांनीं उजव्या हाताची मूठ वळली. ती वर धरली आणि त्याला म्हणाले हलक्या आवाजांत, " See this? Do not repeat it again—not to me ! "

लुईची आई हंसत होती. बहुधा तिला अर्थ कळला नसावा !

—९—

बोट संथ चालली होती. जिनोव्हाचें आखात. इथें समुद्र बहुधा वादळी असतो. पण आज सगळीकडे शांत होतें. हलणें नाहीं, डुलणें नाहीं. सगळे प्रवासी मजेंत होते. करमणुकीसाठीं बोटीवर निरनिराळे कार्यक्रम असतात. पण आज पहिलाच दिवस. अजून ते सुरू झाले नव्हते.

बारमधें जवळच चौघेजण ब्रिज खेळत होते तिकडे माझें लक्ष गेलें. एक दोघे बाजूला बसून डाव बघत होते. त्यांतच एक तरुण मुलगी होती. लोकरीसारखे केंस. ते एका निळ्या फितीनें बांधलेले. वर्ण गोरा. उंच कपाळ. फार मोठे नव्हेत पण पाणीदार असे निळे डोळे. नाक खूप दरदरित होतें. तिच्या ओठांची एक गंमत असे. मिटले म्हणजे फक्त एकच बारीक रेषा दिसे. विलग झाले की त्यांचा रेखीव बांक दिसून येई . समोरच्या दांतांत दोन सोन्याचे होते. ते चमकत.

इतकें वर्णन मी करतों आहें, पण तुम्हाला तिची कल्पना येईल कीं नाहीं कुणास ठाऊक ! माझ्या डोळ्यासमोर तें सगळें रूप जसेंच्या तसेंच अजून आहे. पण प्रथम मी तिला पाहिलें तेव्हां तिच्या चेहेऱ्याचे विशेष मनांत ठसले नसावे, एवढें आठवतें. चेहेरा उदास, भारी खिन्न असा मधूनच वाटे. दृष्टींत बुद्धिमत्तेची झांक दिसे. मी तिच्याकडे बघितलें. त्याच वेळीं तिचीहि दृष्टि मजकडे होती. पण नजरानजर झाली तरी तिचें मन

भांबावलें नाहीं, किंबहुना तिच्या दृष्टींत आश्चर्य दिसले. ती बघत राहिली. शेवटीं मी नजर फिरविली. पाईप ओढीत होतों. तो विझल्याचें निमित्त केलें. काड्याची पेटी शोधूं लागलों.

पुन्हां वर बघितलें. अभावितपणें नजर तिच्यावरच गेली. आश्चर्य असें कीं पुन्हां ती माझ्याकडेच बघत होती. इतक्यांत मन्नान तिच्याजवळ आला. त्यानें तिच्या खांद्यावर हात ठेवला आणि वांकून तिच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. मन्नाननें तिच्याशीं गट्टी करण्यांत यश मिळविलें होतें हें स्पष्ट दिसत होतें. पण त्याच्याशीं बोलतांनाहि ती माझ्याकडेच बघत होती. माझाहि संकोच ओसरला होता. तिच्या धृष्टतेचें आव्हान स्वीकारून मी तिच्याकडे सारखी टक लावली आणि बघत बसलो.

त्या बघण्याचा अर्थ काय होता हें सांगतां येणें कठिण होतें.

पुढें आमची मैत्री झाली. मी हॅर्टाला विचारलें, पण तिलाहि सांगतां येईना.

त्या दृष्टींत चोरटेपणा नव्हता. संभ्रम नव्हता. कसलीहि सूचना नव्हती. भानच नसल्यासारखी होती ती. प्रथम नुसतें आश्चर्य कुतूहल असावें. नंतर एक प्रकारचा नुसत्या बघण्याचा अधाशीपणा. नवल असें कीं चेहऱ्यावर दुसरा कसलाहि भाव नव्हता. ओठावर स्मिताची छायाहि नव्हती. भिवया हलल्या नव्हत्या. कपाळावर सुरकुतीहि नव्हती. हॅर्टाच्या सांगण्यावरून दिसतें. ती तिची प्रीतीची पहिली दृष्टि होती. होती. पण माझें सांगतों. त्या दृष्टीनें मी चकित झालों. थोडासा आकर्षित झालों. यापलिकडे मला कसलीहि भावना झाली नाहीं. एकच विचित्र वाटतें बराच वेळ तिच्याकडे पाहूनहि तिच्याजवळ जाण्याचा, बोलण्याचा, धीर मला झाला नाही. त्या बघण्यांत स्वागत होतें, आमंत्रण होतें. निषेध होता की तिरस्कार होता हें मला मुळींच कळेना, आणि चेहऱ्याच्या बेभानपणामुळें कसलाहि निर्णय करतां येईना. वास्तविक असल्या खेळांत मी तरबेज झालों आहें. दोन वर्षांपूर्वी माझ्या पहिल्या प्रेमाचा चुराडा उडाला. एका मुलीवर माझें प्रेम जडलें. तिचेंहि माझ्यावर होतें. आणा, भाका, शपथा वचनें झालीं. नंतर नोकरीसाठीं वर्ष-भरच ती बंगालमध्यें होती. तिथेंच वडील वारले. ती एकटी झाली. आमचीं

पत्रें जात. मला तरी आठवतें. मी मनापासून, अगदीं जीव तोडून, माझें भाव-वर्णन करीं, तिची पत्रांतून आळवणूक करीं. तिनेंहि आपल्या पत्रांत माझ्याबद्दल असंतोष कधीं प्रकट केला नाहीं. माझ्याजवळ पैसा होता, स्नेही-सोबती होते. सुखाचीं सगळीं साधनें आणि शक्यता होती. अशा स्थितींत एक दिवस आलेल्या तिच्या पत्राचा अर्थच मला कळेना. " तुझ्यावर असलेलें प्रेम खरें नव्हतें आणि नाही. पण एकाकी जीवन असह्य होतें. मी दुसऱ्या एका मुलाच्या प्रेमांत सांपडलें आहें. गेले कांहीं महिने मनानें फार क्लेश भोगले. तुला ते दिसते तर तूं क्षमा केली असतीस. मी त्याच्याशीं लग्न करीत आहें. " असा त्याचा आशय होता.

उमेला लबाड स्वार्थसाधु म्हणणें कठिण होतें. माझ्यापेक्षां तिचा नवरा पैशानें कमी होता. शिक्षणांतहि फारसा फरक नव्हता. त्या पत्रानें मला अर्थातूच धक्का बसला. प्रथम प्रथम त्या मुलीचा द्वेष न करणें अशक्य झालें. तिचाच नव्हे, प्रीतीच्या अनुभवाचाच! गोड भेटी, भुलविणारीं बोलणीं, वेड लावणाऱ्या नजरा, सगळ्यांचा तिटकारा आला. कोणतीहि तरुण मुलगी दिसली, तिच्या वागणुकीचा मोहकपणा नजरेस आला तरी वाटे हा नखरा आहे, नाटक आहे, शुद्ध फसवणूक आहे! शिकारीची तयारी आहे! स्त्रियांचे कोमल आवाज, त्यांचा नाजुकपणा, मनोहर लचक, मुरड, सगळें मला ढोंग वाटे. दिवस काढणें कठिण झालें. शेवटीं उठलों आणि लंडनला निघून गेलों. दोन वर्षें. तेवढ्यांत पुरा तरबेज झालों. पैसा होता, रसिकता होती आणि कटु अनुभवाचा विखार मनांत होता. भोग भोगायचे पुष्कळ आणि पुन्हां मनानें अलिप्त राह्यचें हेंहि साधलें. आतां मला कशाचें कौतुक वाटत नाही. मनापासून हंसतां येत नाहीं, रडतांहि येत नाहीं. जणूं काय भावनांचें तळें युरोपांतल्या थंडीनें भिजून गेलें आहे! त्याचें बर्फ झालें आहे!

हॅटी बघत होती. मीहि टक लावून होतों. पण मनाचा निर्णय होईना. उठण्या बोलण्याचें धाष्टर्य होईना.

ब्रिजचा डाव चालू होता तो संपला. मन्नान पुन्हा हॅटीजवळ आला. त्यानें तिला डेकवर जाऊं म्हणून सुचविलें. तिनें नकार दिला. टेबलावर

डावाबद्दल चर्चा चालू होती. माझ्या जवळच मायकेल बसला होता. तो डावाचे मार्क मांडीत होता. त्यानें विचारलें, " Gentleman, Honours ?"

समोर सहाय होते ते म्हणाले, " जाऊं देरे. पांचसात मार्क कसले मांड-तोस?" मायकेलनें मान हलविली आणि म्हटले,"पांच सात करतां करतांच शंभर होतात आणि शंभर मार्क म्हणजे एक चार पेनी. Must put down honours ! " मी मोठ्यानें म्हटले, " Ah, Michael ! you are worse than a Jew ! "

सगळे मोठ्यानें हंसले, पण माझें तिकडे लक्ष नव्हतें. हॅर्टा एकदम उठली. तिनें मन्नानचा हात धरला आणि ती डेकवर निघून गेली. पण दरवाजाशीं गेली, तिथें क्षणभर थांबली, माझ्याकडे एक कटाक्ष फेकला आणि नंतर बाहेर गेली.

त्या नजरेचा अर्थ करणें कठिण नव्हतें. निराशा, वेदना आणि क्रोध ! एकाएकीं मनांत विचार आला. ही मुलगी यहुदी तर नसेल ?

एक जर्मन सरळ माझ्या टेबलाकडे येत होता. कदाचित् तो आपल्याकडे येईल अशा भीतीनें मी जवळचें पुस्तक उघडलें. वाचायला सुरवात केली. पण तो आलाच. माझ्या टेबलाशीं बसला आणि मुद्दाम बोलायला आरंभ करण्यासाठी त्यानें म्हटलें, "Goodnight Sir !"

मी वर पाहिलें. डोक्याला थोडेंसें टक्कल, स्थूल सुखासीन दिसणारें शरीर, गुबगुबीत चेहरा. पोषाख साधा होता. अर्धी विजार आणि निम्या बाह्यांचा सदरा. माझ्याकडे पाहून त्यानें मस्तक लवविल्यासारखें केलें व पुन्हां म्हटलें, " Goodnight Sir, nice Night."

त्याच्या नजरेंत स्नेहाची अपेक्षा होती. त्याचा हिरमोड करतां येणें शक्य नव्हतें. त्याच्या Goodnight च्या सलामीनें मला थोडें हंसूं आलें. मीं अभिवादन केलें आणि उत्तर दिलें, "Evening Sir. Yes, very pleasant night – isn't it ?"

त्याबरोबर त्याचा चेहरा चिंतातुर झाला.

" Evening ? Goodnight नव्हे ? मला वाटलं गुडनाईट म्हणायचं."

मी सांगितलें, " गुडनाईट बहुधा निरोपाच्या वेळीं म्हणायचं. संध्याकाळीं प्रथम भेट झाली म्हणजे Goodevening म्हणून स्वागत करायचं असतं."

" अस्सं होय?" असें म्हणून त्यानें शर्टच्या खिशांतून एक वही काढली आणि हा फरक लिहून घेतला. नंतर पुन्हां विचारलें, " मी Nice night म्हणालों. तुम्ही काय बरं म्हणालांत?" मी म्हटलें, "Pleasant night." " होय होय. Pleasant. Pleasant म्हणजे काय? त्याचें स्पेलिंग सांगाल? मी लिहून घेतों."

मी हताश झालों. शिंदे कां उठून गेले तें मला कळलें! हाच तो त्यांचा जर्मन, इंग्रजी शिकूं बघणारा! पोर्टहोलमधून बाहेर पाहिलें. आकाशाचा एक वर्तुळाकार तुकडा दिसत होता. पुष्कळशा चांदण्या. रात्र खरोखरच सुंदर दिसत होती. निरभ्र आणि निळी. पण या अरसिकाला तिच्या सौंदर्याचें कौतुक नव्हतें. इंग्रजी स्पेलिंगचें होतें.

त्याच्या बोलण्यानें मी पुन्हां शुद्धीवर आलों. त्यानें डिक्शनरी काढली. तींतलें पान उघडून तो म्हणाला, " सांपडलें. PLEASANT प्लेझंट म्हणजे pleasing. प्लीझिंग म्हणजे काय? छेः मला इंग्रजी-जर्मन डिक्शनरी मिळवली पाहिजे. प्लीझिंग म्हणजे काय? सांगतां कृपा करून?"

मला सांगतां येईना.

उदाहरणें देऊन अर्थ व्यक्त करण्याचा प्रयत्न केला. शेवटीं एकदांचें त्याला समजलें. मला थोडासा संशय आला. त्याचें मोडकें इंग्रजी मला समजूं लागलें. त्याच्याशीं बोलावें कसें हेंहि ध्यानांत आलें. सावकाश, सोपे शब्द, साधीं वाक्यें वापरायचीं. बोलतांना त्याच्या चेहेऱ्याकडे सारखी नजर ठेवायची. शब्द अडला कीं त्याच्या कपाळावर चिंतेची आढी पडे. लगेच प्रतिशब्द, दुसरे शब्द, उदाहरणें, हाताचे आविर्भाव, निरनिराळे उपाय योजण्याचा मी प्रयत्न करीं. मी बीर देऊं केली. ती त्यानें घेतली नाहीं. सिगरेटहि नाकारली. पण सभ्यपणें. तो मला आवडूं लागला. कायटेल त्याचें नांव. त्याचें हंसणें मनमोकळें होतें. बोलणें आर्जवी असे. डोळ्यांत आनंद दिसे. पण एक

प्रकारची क्षमाशीलताहि वाटे. त्यानें जग बरेंच पाहिलें होतें यांत शंका नाहीं. आम्ही पुष्कळ वेळ बोलत होतों.

मीं म्हटलें, " तुम्ही शांघायला जातां आहांत. तुम्ही चिनी शिकण्यासाठीं धडपड करायची. ती इंग्रजीसाठीं कशी करतां ? "

त्यानें उत्तर दिलें, " मला शांघायला पोट भरायचें आहे. इंग्रजीला किंमत आहे ती चिनीला नाहीं. तुम्हांला शांघायची कांहीं माहिती आहे का ? "

मला कांहींच माहिती नव्हती. पण म्हटलें, " ऐकून थोडी आहे. त्यावरून वाटतं, किंमत नसली तरी चिनीवांचून तुमचं बरंच अडेल. "

त्यानें हंसून विचारलें, " तुम्हांला चिनी येतं का ? " मी नाही म्हणतांच तो म्हणाला, " चिनी ही भाषाच नव्हे अशी माझी समजूत आहे. बाजारांत कुत्र्यामांजरांची खेळणीं मिळतात. तुम्ही पाहिली आहेत ? डोक्यावर मारलं, पोट दाबलं कीं चीं चीं, चूं चूं करतात, तीच चिनी भाषा अशी माझी समजूत आहे ! " असें म्हणून तो हंसला, मीहि हंसलों, त्याच्या हंसण्यांत इतका सहजपणा होता ! मीं त्याला म्हटलें, " तुम्ही फार छान हंसतां ! " थोडें गंभीर होऊन त्यानें उत्तर दिलें, " होय आतां गळा मोकळा वाटतो. चार वर्षें झालीं. हंसणं विसरलों होतों. "

त्या शब्दानें, विशेषतः त्या स्वरानें मी चपापलों. त्याच्या खाजगी दुःखाबद्दल बोलणें मला शक्य नव्हतें. विषय बदलण्यासाठीं मी म्हटलें, " तुमची कल्पना खरंच चांगली आहे. असलीं चिनी बोलणारीं कागदी कुत्रीं मांजरें तुम्ही शोधून काढलीं तर तुमचा त्रास किती तरी वांचेल ! "

" माझी एकट्याची कां, हजारोंनी आम्ही जर्मन्स चीनला जात आहोंत. सगळ्यांना त्याचा उपयोग होईल. खरंच ", तो पुढें म्हणाला, " या कल्पनेचं पेटंट घेतलं तर मीं श्रीमंत होईन. पोटाची ददात मिटेल. इंग्रजी शिकण्याचं टळेल ! " मीं हंसून म्हटलें, " इंग्रजी शिकण्याचं टळेल ही गोष्ट तुमच्या सारख्याच्या, माझ्याहि आनंदाची आहे. पण तुम्हांला इंग्रजी आवडत नाहीं ? "

तो म्हणाला,"मुळींच नाहीं." "मग कोणची भाषा आवडते?" "माझी मातृभाषा डॉईश्-जर्मन." "मग ही व्यर्थ धडपड कशाला करतां ?" "शांघायमधें जर्मनला किंमत नाहीं." "पण एवढ्या अडचणींत पडायचें, जर्मनी सोडायचा, इंग्रजी शिकायचें, असला अट्टाहास कां ?"

त्यानें हलक्या आवाजांत सांगितलें, "मी जर्मन म्हणवतों. जर्मनी माझी मातृभूमि आहे. डॉईश् मातृभाषा. पण जर्मनी मला आपला पुत्र समजत नाहीं. मी ज्यू आहें. हद्दपार झालों आहें. म्हणून शांघायला निघालो आहें. पुन्हा जर्मनी दिसेल अशी आशा नाही. उंटर डेन लिंडनमधें बोललें जातें, तसें शुद्ध अस्सल डॉईश् कानावर पडेल अशी आशा नाहीं. म्हणून मला नवी भाषा शिकली पाहिजे !"

—१०—

हे सगळे ज्यू तर ? क्षणांत प्रकाश पडला. गोरे लोक पण काळ्याशी मिसळून वागतात. बोटीवरचे इटालिअन नोकर आम्हां हिंदीनासुद्धां मानतात, पण यांची उपेक्षा करतात. एक जर्मन पोर मदनानीच्या नादी आहे. मघांची दुसरी मुलगी मन्नानच्या तावडींत सांपडते आहे. लुईची आई शिंद्यांकडे स्नेहाच्या अपेक्षेनें बघते आहे. सगळ्यांचा अर्थ एकच. हे ज्यू तर ! यांच्या छळांची खरीं खोटी वर्णनें मी वाचलीं होतीं. नाझींनी यांचें शिरकाण आरंभलें आहे. त्याच द्वेषामुळें इटली, हंगेरी पोलंडमध्यें धर धरताहेत. सगळें ऐकून ठाऊक होतें. मुंबईला होतों. ग्रँट मेडिकलमध्यें जात असें. तेव्हां नागपाड्याच्या बाजूला यहुद्यांची वस्ती पाहिली होती. पण ज्यू म्हटल्यावर मनांत जीं चित्रें येतात, तीं येत नसत. ज्यू म्हणजे धनलोभी शायलॉक. माणुसकीचा अभाव, दुर्गुणाचें केवळ आगर, नीचतेची मूर्ति, अशी ज्यूविषयीं सगळ्यांची कल्पना. पण या जातीचें दुर्भाग्य मोठें तसा महिमाहि मोठा आहे. उभ्या जगांत टीचभरहि जमीन स्वतःची अशी यांना उरलेली नाहीं. पण मागचें महायुद्ध यांच्या धनलोभापायीं चार

वर्षे चिघळलें. पुढच्या महायुद्धाची स्फोटक कोठारें यांनींच रचून ठेवलीं आहेत. त्यांचाहि भडका होणार तो धनवान् यहुद्यांच्या सूडाच्या इच्छेमुळेंच हें मला माहीत होतें. इंग्लंडचा रशिआशीं बेबनाव, अमेरिका अखेरीस युद्धांत ओढली जाण्याची शक्यता, पॅलेस्टाईनमधल्या भांडणामुळें आरबमुसलमानांची जर्मनीकडे वळणारी सहानुभूति, कुठेंहि पहा. मुळाशीं ज्यूचें राजकारण.

ज्यांना देश नाहीं, मातृभाषा नाही, पण जागतिक संस्कृतीच्या प्रगतीची धुरा प्रमुखपणें वहाण्याचें भाग्य येशुख्रिस्तापासून आइन्स्टीनपर्यंत ज्यांना लाभलें अशी ही ज्यू जात. मी निरखून पाहिलें. एक राष्ट्रचें राष्ट्र या माणसा-वर सूड घेतें आहे! काय याचा अपराध? गेल्या महायुद्धांत जर्मनीचा विश्वासघात ज्यूंनीं केला असें नाझींचें म्हणणें. पण हेंच द्वेषाचें तत्त्वज्ञान इतर देशांतून फैलावत चाललें तर! आजचे चार लाख खाकसर उद्यां कोट्यवधि हिंदूंचें शिरकाण करण्याचें ब्रीद स्वीकारतील का? हिंदूंचीं संघटणें हिंद्वेतर जातीचा मागमूस उरूं नये याच ध्येयानें उद्यां रक्ताचे पूर वहावणार आहेत का? राष्ट्रीय मुक्तीच्या आड येणाऱ्या आजच्या छोट्यामोठ्या जमाती; त्यांच्यावरचें परकीय सत्तेचें स्वार्थी रक्षण उद्यां नाहींसे झाले तर त्यांचे आजचे अपराध उद्यां विसरले जातील का?

तर काय, सुधारणेबरोबर हे द्वेषाचे डोंब भडकत जाणार? गेल्या युद्धाचा सूड हें यहुद्यांचें शिरकाण. मी गोंधळून गेलों. जर्मनीची बाजू खरी असेल. पण माझ्यासमोरचा हा साधा यहुदी, याचा काय अपराध असेल? मग याचा बळी कां जातो आहे? व्यक्तीचें संकट मोठें कीं राष्ट्राची गरज मोठी? आजच नव्हे, शतकानुशतकें ज्यू जात छळांची बळी झाली आहे. पण आजच्या या छळाला विशिष्ट, नवा अर्थ आहे. याची पुनरावृत्ति निरनिराळ्या देशांच्या इतिहासांत होणार आहे का? मुसलमानांनीं जिंकून हिंदुस्थान आपला देश केला, पारशांनीं भीक मागून आश्रय मिळवून हिंदुस्थान आपला देश केला— असल्या राष्ट्रीय सूडाचें नाझी तत्त्वज्ञान इतिहासांत मूळ धरून बसलें तर मानवी सुधारणेची—

अंगावर कांटा आला. अनेक विचार. त्यांत संगति नव्हती. आपला देश आपला कशामुळें होतो ? किती वर्षांच्या, पिढ्यांच्या वस्तीनें भूमीला मातृभूमीचें महत्त्व येतें ? पॅलेस्टाईन ज्यूंचें होतें. हिंदुस्थान आज हिंदूंचें आहे. उद्यां तें तसेंच टिकेल का ? आणि आर्यांच्या वसाहती दक्षिणेंत पोहोंचेपर्यंत हिंदुस्थान कुणाचें होतें ? मातृभाषा म्हणजे कुणाची भाषा ? या यहुद्यांनीं जर्मनी बुडविली, पण स्वतःला अजून हे जर्मन म्हणवतात, डॉईश् मातृभाषा मानतात ही काय केवळ व्यवहारी लबाडीच ? यांना स्वतःला खरोखर काय वाटते ? यांचे लहानपणापासूनचे संस्कार काय आहेत ?

शिंदे आले. कडेवर लुई होता. बरोबर आई होती. मी लुईला म्हटलें, " Goodnight " त्याच्या आईनें म्हटलें, "Say goodnight to uncle." त्यावरोबर तो एकदम म्हणाला, ' Good nacht." शिंदे म्हणाले, "No you scamp, say goodnight in English." पण मान हलवून अस्सल जर्मनीमध्यें तो म्हणतो, "Nein, Nein. Deutsch. Good nacht."

## —११—

नापोली बंदर. जिनोव्हा ते नापोलीचा प्रवास सुटीच्या सफरीसारखा वाटतो. पुरें दिवसाचेंहि अंतर नाहीं. इटालिअनांना तर घरांतच फिरून आल्यासारखें वाटायचें. बाहेरच्या प्रवाशांना सगळेंच कुतूहल. आधीं शहर भारी सुंदर आहे. त्यांत ऐतिहासिक अवशेषांमुळें त्याची प्रसिद्धी विशेष. पाँपेची स्मृतिचिन्हें इथेंच आहेत. व्हेस्युव्हिअसचें भयाण सौंदर्य इथेंच. युरोप सोडतांना युरोपच्या भूमीला शेवटीं पाय लागायचे ते इथेंच.

ऊन चटचटत होतें. बोट थांबली होती. आठच वाजले असतील. साडे-नऊपर्यंत सकाळच्या न्याहरीची वेळ होती. पण बंदरावर जायचें म्हणून जो तो घाईंत होता. आठ साडे—आठलाच सगळे न्याहारी संपवून मोकळे झाले होते. मी गेलों तेव्हां उतरायला केव्हां मिळणार एवढीच चर्चा चालू होती.

खालीं गेलों. न्याहारीला एका टेबलावर बसलों. सबंध दिवाणखाना जवळ जवळ रिकामाच होता. दहापंधरा जण असतील. त्यांचाहि चहा संपत आला होता. दुसऱ्या टोंकाच्या एका टेबलावर कायटेल बसला होता. दुसरें एक ज्यू जोडपें होतें. एक प्रौढ स्त्री बसली होती. बहुधा मिशनरी असावी.

त्या जोडप्यानें माझ्याकडे बघून स्मित केलें. मीहि उठलों, त्यांच्या टेबलावर गेलों. एक खुर्ची ओढली. पदार्थांची छापील यादी होती ती हातांत घेतली.

इतक्यांत हॅर्टा आली. तिची आई बरोबर होती. मागोमाग मन्नान होता. तिच्या अंगावर रात्रींचाच पोषाख होता. बरीच गरीब असावी असा मी तर्क केला. पण पाहिल्याबरोबर आठवण झाली. रात्रीं ती रागावून गेली ती परत आली नाहीं. आपला अंदाज चुकला. पण अंदाज चुकला तरी मुलांच्या मागें फिरण्यांत मौज मानणारी ती उनाड मैना नाहीं अशी खात्रीहि पटली.

सगळे न्याहारी करीत होते. मी परिचारकाला ओटची खीर आणायला सांगितली होती. त्याची वाट बघत होतों. बंदरावर उतरण्याच्या गोष्टी चालू होत्या. परिचारक सारखा टेबलापाशी येई. कुणाला ब्रेड, कुणाला चहा, कुणाला मुरंबा आणून देई. दहा मिनिटें झालीं तरी खिरीचा पत्ता नाहीं. मी कागद मांडीवर पसरून स्वस्थ बसलों होतों.

त्याच्याकडे निरखून पाहिलें. बांधेसूद शरीर आणि चेहऱ्यावर मग्रूरी. शेवटीं पुन्हां चहा ओतून तो परत फिरला. त्यानें माझ्याकडे पाहिलेंहि नाहीं. तेव्हां त्याला हांक मारून विचारलें, “ माझ्या खिरीची तुला आठवण आहे ना ? ” त्यानें निर्विकार मुद्रेनें उत्तर दिलें, “ होय आहे.” थोडा आवाज चढवून मी म्हटलें, “ Be quick about it then !” पण तो जवळ आला. त्यानें थोडें वांकून मला म्हटलें, “ त्या टेबलावर बसा.” मी त्याला विचारणार एवढ्यांत त्यानें पुढें म्हटलें, “ हें टेबल गोऱ्या लोकांसाठीं आहे, तुमच्या-सारख्या काळ्या लोकांकरितां तिकडची टेबलें आहेत ! ”

मी ताडकन् उठलों. त्याची मानगूट धरली. ट्रेचा, किटलीचा, चहाच्या भांड्यांचा खळखळाट झाला. सगळेच चकित झाले असावे. तो परिचारक मात्र आश्चर्यानें एवढेंच उद्गारला, " Oh Maria ! "

त्याला गदगदा हलवून मीं म्हटलें, " You swine, say it again and I will make you lick the floor. Get me my batmeal here and be quick about it ! "

सगळे धांवले. ज्यू होते ते भांबावले. मन्नान जवळ आला. दोघे चौघे परिचारकहि आले. त्यांच्या मुख्यानें माझी माफी मागितली. त्यालाहि माफी मागायला लावली. मी पुन्हा बसलों. थोड्या वेळानें न्याहारीला सुरुवात केली.

इंग्लंडमध्यें एखादे वेळीं याचें आश्चर्य वाटलें नसतें. त्यांना आपल्या जेतेपणाची घमेंड तरी आहे, पण इटालियन्ससुद्धां ? युरोपचे भिकारी, सगळ्या युरोपांत त्यांतल्या त्यांत गोरेपणांत डावे, निव्वळ मोहबतीनें हिंदुस्थानची वहातूक व्यापारी वाहतूक करण्याची संधि मिळालेल्या इटालियन्सनासुद्धां हे धाष्टर्य होते ? माझें रक्त चढलें होतें. सगळ्यांची नजर आपल्याकडे लागलेली असेल ही जाणीव होऊं लागली. वर बघवेना. घांस घेतां येईना. शेवटी टेबलावरचे सगळे उठून गेले, तेव्हां बरें वाटलें. मी वर पाहिलें. हॅटी पुन्हां माझ्याकडे पहात होती. तिच्या नजरेंत स्नेह होता.

न्याहारी संपली. मी पाइप काढला. काड्यावर काड्या ओढल्या. त्या विझून जात. अंगावरच व्हेंटिलेटर होता. त्याच्या वाऱ्यानें त्या विझत. त्यांत हात अजून थरथरत होता. माझ्या लक्षांत तें आले नाही. शेवटीं हॅटी हंसत हंसत उठली. तिनें व्हेंटिलेटरचें तोंड वळवलें तेव्हां काडी पेटली.

मी वर पाहिलें. तिच्या तोंडांत नुकतीच घेतलेली सिगरेट होती. मी ती शिलगावली व मनापासून म्हटलें, " Thank you so much,"

तिच्या चेहऱ्यावर समाधानाचें स्मित होतें. मी पाइपवर काडी ठेवली तेव्हां माझ्या ध्यानांत आलें. हाताची थरथर थांबली आहे.

## —१२—

नेपल्स भारी सुंदर आहे. मागें हिंवाळ्यांत मी कांहीं दिवस इथें काढले होते. बर्फानें जमीन बुडवून टाकली होती. हिंवाळ्याच्या भयंकर वाताहातीवर सृष्टीनें पसरलेली ती शुभ्र मायेची पांखरच होती. शेतें, कुरणें, रानें, घरें, सगळ्यांचीं स्वतंत्र स्वरूपें हरपलीं होतीं. बर्फाच्या असीम धवलतेंत सगळीं एकरूप झालीं होतीं ! जिकडे तिकडे अमर्याद शांतता. झाडें खुरटलीं होतीं. फांद्या पर्णहीन झालेल्या होत्या. पण त्यावर बर्फाची शुभ्रता चढली होती. सगळ्या सृष्टीला निरामय, शांत, धवल अशा एखाद्या प्रचंड प्रार्थना-मंदिराचें स्वरूप आलें होतें. बर्फानें मढविलेल्या झाडांच्या फांद्या प्रार्थना-मंदिरांतल्या मेणबत्त्यासारख्या वाटत. दैवी चमत्कारांच्या अपेक्षेने चराचर मुकें होतें, तशी आतुरता त्या असीम शांततेत होती.

समोर दृष्टि फेंकली. नेपल्स नगरीचा तो पहिला आणि संपूर्ण साक्षात्कार होता ! समुद्रसपाटीपासून डोंगरमाथ्यापर्यंत टुमदार घरें उभीं होतीं. आकाशांत ढग तरळत होते. त्याच्याहि वर एकच उभें असलेलें व्हेसुव्हिअसचें शिखर ! महाकाव्यांतल्या कल्पनांच्या फाफटपसाऱ्यांत एखादा उदात्त, विशाल, क्रांतिकारी असा तत्त्वविचार असावा तसें तें ढगांच्या, धुक्याच्या, बर्फाच्या वर शोभत होतें. खालीं दरींत आधुनिक इटलीच्या सामर्थ्याचें प्रदर्शन होतें. कारखाने, बंदरातलें नाविकदल, घिरट्या घालणारीं विमानें, दूर खडकावरचीं जलमंदिरें, बागांतलीं विहारगृहें, आणि सगळ्यांवर अप्रतिम सृष्टिशोभेची छाया. सगळं बघून, रसिक पराक्रमी पण तत्त्वज्ञ राजपुरुषाविषयीचें प्लेटोचें स्वप्न खरें झाल्याचा क्षणमात्र भास झाला !

पण त्या सुंदर क्षणांचा विध्वंस फुलें चुरगळलीं जावीं असा सहजपणें झाला. तें उपहारगृह होतें, तिथें बसावयाचें तर फराळ करायला पाहिजे होता. निदान दारू विकत घ्यायला हवी होती. पण हॅटीनें आणि हरमान जोड-

प्यानें मोटरचें भाडें देण्यांतच मोठा हिय्या केला होता. आणखी पैसे खर्च करणें त्यांना अशक्य होतें. त्यांना सोडून मी आणि शिंदे मागें राहणेंहि शक्य नव्हतें.

सगळे हिरमुसले होऊन परत फिरले. गाडींत हॅर्टानें डोक्यावर रुमाल घेतला. फ्राऊ हरमान तिला म्हणाली, " पोरी, बाहेर बघ – पुन्हां दिसेल न दिसेल. दुकानं किती सुरेख आहेत ! "

हॅर्टानें उत्तर दिले, " पाहिलं कीं विकत घेण्याची इच्छा होते. आणि मग कोंडमारा होतो. त्यापेक्षां आधीच डोळ्यावर कांतडं ओढून घ्यावं हें चांगलं !

—१३—

डेकच्या कठड्यावर वांकून, हनुवटी टेंकून मी उभा होतों. फेंसाचे तुषार तोंडावर उडत. बोटींतल्या दिव्यांचा प्रकाश दोन्ही बाजूला पाण्यावर पडला होता. कापले गेलेलें पाणी उडे, त्याचा फवारा प्रकाशांत चमके आणि खालीं आदळे.

डेकच्या मधोमध लहानसा आडवा कठडा होता. पुढचा भाग टोंकापर्यंत मोकळाच होता. पण तो डेक प्रवाशासाठीं नसे. जाडजूड दोरांच्या गुंडाळ्या, त्यांचे ढीग, साखळदंड, नांगर उचलण्यासोडण्याची लहान क्रेन, आणि पलीकडे बोटीचें नाक, त्यावर निशाणाची काठी. मध्येंच एक लहानशी लोखंडी कमान होती. तींत खूप मोठी घांट टांगलेली होती.

त्या दोरखंडाच्या ढिगांवर एक दोन खलाशी विड्या ओढत बसले होते. माझ्या डेकवर दोघे चौघे असतील नसतील. पण अंधार होता. ओळखतां येणें कठिण होतें. अगदी कोपऱ्यांत एक जोडपें असावें. अँग्लो-इंडिअन मुलगी आणि एक गोरा तरुण. तीं दोघें स्त्रीपुरुष आहेत हें पहातांच मीं मान वळविली. हॅर्टा केव्हां येऊन उभी राहिली होती हें मला कळलें

नाहीं. कठड्यावर कोंपरे टेंकून दोन तळहातांच्या कोणांत हनुवटी टेकून ती समोर बघत होती. मी मान वळविलेली दिसतांच ती म्हणाली, " मी आलें आहें. " त्या साध्या वाक्याचें मला हंसू आलें आणि मीं म्हटलें, " होय, मला दिसतं आहे असंच म्हणणार होतों, पण अंधारांत दिसत नाहीं नीटसं. तेव्हां तें खरं नव्हे. " पुन्हा समोर बघतच तिनें म्हटलें, " हें सुद्धां खरें नाहीं. तुम्ही दिसत नाहीं असं मी म्हटलें तर शोभेल एक वेळ, कारण तुम्ही सांवळे आहांत. " मी म्हटलें, " मी सांवळा असेन, पण तुमच्या केंसाइतका काळा खास नाहीं. तुमचा सगळा चेहरा भुरभुरणाऱ्या केसांनीं झांकला आहे. तुम्ही दिसणार कशा ? " तिनें मान वळवली आणि माझ्याकडे पाहिलें. कांहीं तरी बोलणार इतक्यांत खालचे पाणी थोडें जास्त वर उडालें आणि तिचें सगळें तोंड भिजून गेले !

तिच्या अंगावर पातळसा कोट होता. पण तो नुसता पांघरलेला होता. एका हातानें तो धरून ठेऊन ती म्हणाली, " माफ करा. तुमच्याजवळ रुमाल आहे का ? " असें म्हणून तिनें माझ्या हातांतल्या रुमालाचें टोक धरलें. तो मागें ओढीत मीं म्हटलें, " तो नका घेऊं. मी दुसरा देतों. " " कां ? " " तो घाण झाला असेल बराच ! " " असूं द्या. माझ्या रुमालापेक्षां नसेल कांहीं. तुम्ही आजच काढला असेल ना ?" "होय." "द्या तर. माझा दोन तीन दिवसांचा आहे." पण मी कोटाच्या बाहेरच्या वरच्या खिशांतला शोभेसाठीं ठेवलेला चांगला रुमाल होता तो तिला दिला. तिनें तोंड पुसलें. केंस कपाळावर गालावर चिकटले होते ते मागें सारले. रुमाल परत घेतांना मीं म्हटलें, "तुम्ही रागावूं नका. पण तुम्ही म्हणालांत चार-पांच दिवस एकच रुमाल वापरतां आहां. कां बरं ? " " रुमालच काय, दोन दिवस झाले झगासुद्धां एकच वापरतें आहें. " " होय. मी पाहिलं आहें. पण कां ? " "माझं सामानच सांपडत नाहीं." मीं आश्चर्यानें म्हटलें, " सामान हरवलं ? कसलं सामान ? " " सगळंच हरवलं नसेल. पण

सांपडत मात्र नाहीं." मीं म्हटलें, "असं होईल कसं? बॅगेज रूममधें असेल. तुम्ही स्टयुअर्डला विचारलंत का? चला आपण विचारूं?" असें म्हणून मी जवळ जवळ वळलोंसुद्धां.

माझ्या उत्साहाचें तिला हंसू आलें. पण त्याच क्षणीं तिचे डोळे थोडे माझ्या सहानुभूतीनें चमकले एवढें मला आठवतें. तिनें स्ट्युअर्डला विचारलें होतें. बॅगेजरूम बघितली होती. वर खाली, Passageमध्यें, दुसऱ्या केबिन्स-मध्यें, रागळीकडे खेपा घातल्या होत्या, शोध केला होता. पण सामानाचा पत्ता नव्हता. सगळे कपडे, थोडी पुस्तकें, औषधाच्या कांहीं बाटल्या, वेणीफणीचें सामान, तिच्या आईच्या पेट्या, कशाचाहि पत्ता नव्हता.

माझ्या अंगावर कांटा आला. जवळ जवळ महिन्याचा प्रवास आणि अंगावरचा कपडा बदलायला नाहीं! तोंड पुसायला रुमाल नाहीं! त्या म्हातारीची काय अवस्था होईल? आणि ही सुंदर पोरगी? चांगल्या कपड्यांचें दारिद्र्य म्हणजे हिला केवढी शिक्षा? मीं रुमाल तिच्यापुढें केला आणि म्हटले, "हा असूं द्या तुमच्याजवळ. नवाच आहे." तिनें मान हलवून म्हटलें, "नको. नको. उद्यां परवांपर्यंत सांपडेल माझं सामान." मीं आग्रह केला, पण तिनें तो घेतला नाहीं. समोर एकदम बोट दाखवून तिनें विषय बदलला व म्हटलें, "तो तारा आहे का दिवा आहे सांगा बघूं?" मी पाहिलें खरेंच, एकदम ओळखणें कठिण होतें. क्षितिजाच्या फार वर नव्हे पण आकारानें बराच मोठा. तो प्रकाशबिंदु पाहून मी म्हटले, "ताराच." तिनें मान हलविली व म्हटलें, "छट् चुकलांत!" मीं थोडें ओजित होऊन म्हटलें, "ताराच आहे. पैज आपली." त्याबरोबर ती म्हणाली, "तुम्ही पैशाशिवाय बोलतच नाहीं. मी गरीब झालें आहे भारी. तुम्हांला सांगितलं ना?"

मी वरमलों. साध्या संभाषणांतहि तिच्या दुःस्थितीची आठवण टाळतां आली नाहीं याचा विषाद वाटला. तिनें रोखून बघत म्हटलें, "रात्र किती सुंदर आहे आणि तुम्हांला पैजेचे आणि पैशाचे विचार सुचतात. तुमच्या-कडून प्रेम होणं कठिण दिसतं!" मीं हंसून म्हटलें, "प्रेम न साधलं तर

न साधो. लग्नाच्या आयुष्यांत पण मी बायकोला सुखी ठेवीन असं तुम्हाला वाटतं की नाहीं ?"

नंतर मधला कठडा ओलांडून आम्ही पुढच्या डेकवर गेलों. बोटीचा वेग वाढत होता. वारा जोरानें वहात होता. पाणी बरेंच उसळे. समोरचा डेक बराच भिजला होता. कठडे ओले झाले होते. त्या वाऱ्याच्या सोसाट्याने हॅर्टीची तारंबळ उडूं लागली. केंस सारखे भुरभुरत. ओव्हरकोट नुसता पांघरलेला, त्यांत वारा भरे. मीं म्हटलें, "तुम्ही कोट अंगांत घाला. त्रास कमी होईल." तिनें उत्तर दिलें, " नको. माझा नाहीं तो. फ्राउ हरमानचा आहे. मी थोराड आहें जराशी. कदाचित् फाटेल." आम्ही कठड्यापाशी उभे राहिलों. तिनें कोट आपल्या पाठीनें कठड्याशीं दाबून धरला. मी रुमालानें कठडा थोडा पुसला आणि त्यावर कोंपरें टेकलीं.

असीम शांतता. पण त्यांत एकांताचा भयाणपणा नव्हता. बोटीचे, पाण्याचे होणारे आवाज. त्याची कानांना संवय झाली होती. त्याकडे लक्षच जात नव्हतें. लाटा नुसत्या आळसावून उठल्यासारखें करीत, दुमडत, घडी पडे, आणि पुन्हां ओसरत. समुद्राचा दाट काळिमा. त्याची सावली क्षितिजाच्या किती तरी वर आकाशांत पसरली होती. क्षितिज त्यांतच लपलें होतें. चहूंकडे ओलसर वास, पण त्यांत, हवेत, ताजेपणा होता. नुसता श्वास सुद्धां उत्तेजक वाटे.

त्या शांततेनेंच आम्ही मुके झाल्यासारखे झालों. बोललों नाहीं, एकमेकांकडे बघितलें नाहीं. हॅर्टी थोडी माझ्या बाजूला सरकली. मी पाहिलें. तिनेंहि दृष्टि वळवली. त्या नजरेंतून स्नेहाची ऊब सांडत होती. मध्येंच वाऱ्याचा झोत आला. तिच्या ओव्हर कोटची बाही लोंबत होती. तिचा फटकारा खांद्यावर बसला. पुन्हां उडूं नये म्हणून मी माझ्या हातांत अडकविली आणि कठड्यावर दाबून धरली. हॅर्टीनें विचारलं, " काय करतां ?" कसें उत्तर गेलें कुणास कळे. मीं म्हटलें, " तुमच्या हातांत हात अडकवून उभें राह्यचं, पण मी बाहीवरच समाधान मानतों आहें !" तिनें समोर

बघत उत्तर दिले, "अल्पसंतुष्ट माणसं कुणाला आवडत असतील तीं असोत. मला मुळींच आवडत नाहींत!" मी तत्क्षणीं बाही सोडली. तिच्या हातांत हात अडकवला आणि बोटें माझ्या हातांत दाबून धरिलीं. पुन्हां समोर बघतच ती म्हणाली, "तुम्ही सभ्य गृहस्थ आहांत ना? आपली अजून ओळख झालेली नाहीं, हें विसरूं नका. माझें नांव हॅर्टी." "आणि माझं चक्रधर विध्वंस." स्वतःला सोडवून घेत ती उद्गारली, "अरे देवा! आपली मैत्री जमेलसं दिसत नाही. किती अवघड हें नांव?" मी म्हटलें, "माफ करा तुम्ही. पुढं भेटणार आहां हें माझ्या आईच्या ध्यानांत आलं नाही नांव ठेवतांना?" "हेंच कठिण नांव घेऊन तुमच्या आईनें तुमच्यावर प्रेम केलं असतं का?" मी उत्तर दिलें, "नाही. घरी मला सगळे बाबू म्हणतात." "बॉब?" पण मी नाहीं म्हणतांच ती पुढें बोलूं न देतां म्हणाली, "मी तुम्हांला बॉबच म्हणणार. फार झालं तर मिस्टर बॉब म्हणेन."

मी हंसलो व म्हटले, "जसं तुम्हांला आवडेल तसं, पण मिस्टर बॉबच म्हटलं पाहिजे. आपली अजून फार ओळख झालेली नाही तोंवर." तिनें जोराने मान हलविली. हातांत हात घेतला व म्हटलें, "मी नाही मिस्टर म्हणायची, बॉबच म्हणेन. म्हणूं ना, बॉब?" माझ्या हातांत तिचा हात होता. तो मी दाबला व म्हटलें, "होय, हॅर्टी."

## —१४—

सुंदर स्वप्न भंगतें आणि जाग येते तेव्हां मन खिन्न होतें. पण रात्रीं निजलों तेव्हां मनोहर चित्रें डोळ्यापुढे तरळत होती. पुन्हा पुन्हा मन त्यांत जगे, बागडे. पण त्या स्वप्नाच्या कैफानें डोळे धुंद झाले आणि त्यावर निद्रेची गुंगी केव्हां चढली तें कळलें नाही. जागा झालों तेव्हां नऊ वाजले होते. न्याहारीची वेळ टळून गेली होती. शरीर आळसावलें होतें. पण

मनावर ताजेपणा होता. स्ट्युअर्डला बोलाविलें. खोलींतच चहा मागवला. आणि पोर्टहोलकडे तोंड करून पुन्हा उशीवर पडलों.

मी बाहेर बघत होतों. कालच्या आठवणी मनांत उजळत होत्या! त्या प्रवासांत बोटीवर मला एक विचित्र संवय पुढें जडली. घडलेल्या गोष्टींची उजळणी स्मृतीनें करावी. केवळ त्रयस्थासारखी. पाहिलें असेल तें घडलें कसें, त्यावेळची परिस्थिती काय असेल, तें माणूस एकटें असतांना कसें वागलें असेल, त्याच्या मनाच्या यातना, वेदना, क्लेश, संताप, आनंद, उत्साह, सगळ्याचीं चित्रें कल्पनेनें रंगवावीं, खेळ मांडावा, झालें असेल तें पुन्हा जागण्याचा प्रयत्न करावा!

आणि कल्पनेला स्फुरविणाऱ्या गोष्टी तरी किती होत्या! रोज नवा देखावा, नवे अनुभव, नव्या माणसांच्या ओळखी, त्यांच्या जगांत प्रवेश, अंतरंगांतहि शिरकाव! मी विचार करूं लागलो. आठच प्रहर झाले असतील. त्या मुलीशीं माझें बोलणेंहि नव्हते. आणि आज सकाळीं? इतका रागावलेला मी, पण माझ्याहि अंगावर रोमांच उभे राहिले. हें माझें शरीर माझेंच राहिलें आहे का? गवसणींतल्या सतारीसारखें आतां बिछान्यावर तें निर्जीव वाटतें. माझ्या अंगावरच्या या रात्रीच्या मळकट वेषामुळे मुळीं त्याला अधिकच कळा आली आहे! पण या त्वचेचें एक छिद्र नसेल की ज्यांत अनेकवार खऱ्याखोट्या प्रेमाच्या मनोहर कूजितांचे पडसाद उठले नसतील! माझ्या ओठांत पवित्रअपवित्र चुंबनांची चटक वारंवार थरथरली आहे. या डोळ्यांनीं अनेक सागरांचा नीलिमा पाहिला आहे. अनेक नजरांचा थांग घेतला आहे!

रात्रीं हॅर्टाशीं मैत्री झाली. त्या अनुभवाने मन जागें होईल असें संध्याकाळीं कुणी म्हटलें असतें तर मला खरें वाटलें नसतें. मी त्याला वेडा, अननुभवी म्हणून सोडून दिलें असतें! पण प्रत्यय निराळा आला. मागें कांहीं झालेंच नाहीं अशा आवेगानें शरीर पुन्हा जिवंत झालें. मन चैतन्यानें भारलें गेलें. कात टाकल्यावर नाग तरुण होतो कीं तारुण्याची नवी उसळी आल्यावर तो कात टाकतो हें मला माहित नाहीं. पण काल हॅर्टाच्या

मिठींत न्हाऊन निघालेलें हें शरीर. त्यावरचें किल्मिष झडून गेल्यासारखें वाटतें आहे. तिचाहि बेभानपणा असीम होता. आमच्या मागें तें जोडपें उभें होतें. मीं तिकडे सहज नजर वळविली. त्याबरोबर माझी हनुवटी धरून तिनें माझें तोंड फिरविलें. मीं विचारले, " कां ? " तेव्हां स्निग्ध स्वरांत ती म्हणाली, "बॉब, तिकडे बघूं नकोस. बिचारीं सुखांत दंग आहेत. पाहिलेंस तर चोरट्यासारखें होईल त्यांना. " मीं मुद्दाम म्हटलें, " दंग आहेत म्हणजे काय?" तिनें माझे खांदे धरून मला फिरवलें. आपणहि समोर वळली. आम्ही दोघेहि बघूं लागलों. कठडा कार्डबोर्डसारखा चित्रांतला दिसत होता. पलिकडे अथांग निळेपणा. त्या तरुणानें पोरीला जवळ घेतलें होतें. त्याच्या मिठींत तिचें भान हरपलेले, कमरेशीं धनुराकृति झालेलें तिचे कृश मनोहर शरीर ! तो घेत असलेलें तिचें चुंबन !

वरती कप्तानाच्या केबिनमध्यें लहानशी घंटा वाजली. क्षणमात्र सर्च–लाइटचा प्रकाश डेकवर पडला. त्यांच्या देहाच्या रेषाकृति सजीव झाल्या. मागचे तारे लोपून गेले. पण पुन्हा काळोख. आणि नुसतीं त्यांचीं निळ्या पार्श्व-भूमीवरच्या तारकांच्या चांदण्याच्या फिकट प्रकाशावर उमटलेलीं छायाचित्रें. ( Silhouettes )

हॅर्टीनें मान वळवून माझ्याकडे बघितलें व म्हटलें, " आतां या वस्तु-वादाच्या धड्यावर पाठ फिरवूं या. "

तिच्या निर्भीडपणाने मी चकित झालों. तिला एकदम जवळ ओढलें. तिचे केंस मागें सारले. आणि तिचें चुंबन घेतलें ! इतका वेळ आम्ही तसेच उभे होतों कीं तिच्या अंगावरचा कोट गळून पडला तें ध्यानांत आलें नाहीं. थोड्या वेळानें वाऱ्याचा गारपणा झोंबू लागला तेव्हां ती अधिकच बिलगली व म्हणाली, " बॉब भारी थंडी वाजते आहे. मला जवळ घेतोस ?"

तें पहिलें चुंबन म्हणून मला आठवतें असें नव्हे. तें पहिलें नव्हतें. तिचेंहि आणि माझेंहि. पहिलें दुसरें अशी मोजदाद शक्य नव्हती. वारंवार ओठांची घट्ट मिठी पडे. आतां नवल वाटतें. माझे ओठ हॉटेलांतल्या पेल्या-

इतके अपवित्र झालेले आहेत. पण अनुभवी आहेत. त्या तिच्या मुक्यांत हिंदी चुंबनाचा शालीन चोरटेपणा नव्हता. स्वैराचारी स्त्रीची किळसवाणी घसमुसळ नव्हती. भावनांचें तुफान संपून स्थिरचित्त झालेल्या तरुणीच्या 'हो 'काराच्या पोटीं जो आत्मार्पणाचा ( surrender ) आवेग असतो तो त्यांत होता. त्यांत साधेपणा होता, निस्संकोच होता, आव्हान होतें आणि अतृप्तिहि होती. आणि ही अतृप्ति तर पुन्हां पुन्हां जन्माला येई. सारखी ती बिलगून उभी होती. तिचा श्वास जोरावला होता. ऊर उडत होतें. हातानें ती बरगड्या दाबून बघे. हताशपणें माझ्याकडे पाही, मध्येंच थरथरे आणि एखाद वेळीं म्हणे " या धुंदीची भीति वाटते बॉब. तूंच संभाळ. "

मेसिनाची सामुद्रधुनी जवळ आली. बोटीचा वेग कमी झाला. पाण्याची खळखळ ओसरली. इटलीचें शेवटचें टोंक. रेडिओ दिसायला लागले. दोन्ही किनाऱ्यावर दीपमाळांची गर्दी उसळली. आतां पाणी संथ झालें होतें. त्यांत प्रकाशाचीं प्रतिबिंबें पडायला लागलीं. समुद्राच्या किनाऱ्यापासून वर आकाशांत उंच गेलेल्या टेकड्या. त्यावर वसलेल्या शहरांचे फक्त दिवे दिसत. दीपमाळांची गौर मांडल्यासारखी दुरून दिसे. पाणी उजळूं लागलें. उजव्या हाताला सिसिली. समोरच्या खडकावर एक दीपगृह होतें. त्याच्या प्रकाशाचा झोत पाण्यावरून फिरे. मधूनच नाहींसा होई. इतक्यांत समोरून एक लहानसें जहाज आडवें गेलें. प्रकाशकिरणांची सुंदर वीण पाण्यावर उमटली. गोड अनुभूतीची थरथर शिरापासून तळव्यापर्यंत जाते तशा प्रतिबिंबित प्रकाशकिरणांच्या धारा लाटांच्या फुटल्या मुखांतून तळापर्यंत थरथरत गेल्या ! हॅर्टा अनिमिष नेत्रांनीं तें बघत होती. मला म्हणाली, "बॉब, ही सुखाची सीमा असेल का ? परवां जर्मनींतून मी बाहेर पडलें. छळ, अपमान, तिरस्कार, सूडाचे चावे, सगळ्यांनीं बुजबुजलेलें थडगें झालें होतें तें मला. किती सुंदर हा पुनर्जन्म ! "

मी तिच्याकडे चपापून पाहिलें. ती खरेंच भानावर नव्हती. बोट मेसिनाच्या समोर आली. दीपगृहाचा प्रकाश मध्येंच आमच्यावर पडे. चेहेऱ्यावर तुषारांचा ओलसरपणा आला. तिचे भुरभुरणारे केस मध्येंच माझ्या गालावर

येत, खुपत आणि रोमांच उठवीत. डोळे जडावलेले. एखाद दुसरी बट कपाळावर चिकटलेली. नाकपुड्या, ओंठ, किंबहुना सगळें शरीरच तीर लावलेल्या धनुष्यासारखें आतुर! तिनें माझे हात कमरेभोंवतीं आवळून धरले. इतक्यांत पुन्हां दीपगृहाचा आमच्यावर प्रकाश आला. मी हळूच म्हटलें, " हॅर्टा, असं काय करतेस? मागच्या डेकवर मंडळी येताहेत ती पाहातील. " तिने चटकन् हात बाजूला केले. माझ्याकडे तोंड करून ती उभी राहिली. उत्तेजित स्वरांत ती म्हणाली, " मला कुणाची भीति आहे! आयुष्यांतलें हें अमर्याद सुख समोर उभं असतांना मी चोरटेपणानें तें गमावूं म्हणतोस! मुळींच नाहीं. येऊं दे सगळ्यांना. मी सगळ्यांना सांगतें, कधीच सुखी नव्हतें, दुःखाची परमावधि सोसली आहे, आतां सुखाचे कांही क्षण सांपडताहेत ते जगून घेतें आहे!"

तिचा आवाज वाढूं लागला. मी तिच्या खांद्यावर हात ठेवले आणि शांत करण्यासाठी म्हटले, " हॅर्टा!" तिनें जोरानें मान हालविली आणि म्हटलें, " बॉब, तुलाच माझं सुख पाहवत नसेल तर सांग. नाहीं ना तसं? मग मी कुणालाहि भीत नाही. येऊं देत सगळे. इतकं कशाला. मीच ही घांट वाजवितें, सगळ्यांना बोलावितें आणि सांगतें, आम्ही दोघेहि अतिशय, अतिशय सुखी झालों आहों!" मी पहातच उभा राहिलों. त्या घांटेकडे माझें लक्ष गेलें. तिचेंहि गेलें. तिला एकदम खूप हंसूं आले. मीं विचारलें, " हंसतेस कां?" तिनें सांगितलें, " एकदम आठवण झाली. लग्न झाल्या-वरहि चर्चमधली घंटा वाजवून आनंदाची ग्वाही देतात! माणसांचे संस्कार किती खोल मुळें धरून असतात, नाहीं?"

—१५—

मी बर्थवरच विचार करीत होतों. स्ट्यूअर्डनें येऊन खोली झाडली. केराची टोपली, पॉलिश करायचे जोडे, जुने टॉवेल्स, सगळें नेलें. नेतांना तो

हंसून म्हणाला, " रात्रीं वाटेल तितकं जागतां आणि सकाळी पडून रहातां पुष्कळ वेळ. आतां लंचची सुद्धां वेळ होईल. " तो गेला. मी उठून बसलों.

बाहेर सगळी बोट नित्य व्यवहाराला लागली होती. मी खालीं उतरलों. ड्रेसिंग गाऊन चढवला. आरशापुढें उभें राहून दाढीला साबण लावायला सुरवात केली. माझे विचार चालूच होते.

रात्रीची काळोखांतली प्रीतीची गोड कुजबुज दिवसाच्या व्यवहाराच्या प्रखरपणांत किती कर्कश वाटूं लागते? मघांच्या सगळ्या गोड आठवणी. मघांच्याच नव्हे, प्रेमाचे जेवढे खेळ मी खेळलों होतों तेवढे सगळे आठवूं लागलों. अगदी प्रथम उमेची ओळख झाली तेव्हांपासून सगळ्यांचा अर्थ एकच. असल्या खेळांत जिंकण्याचें सुख खरें असतें कां नुसतें खेळण्याचें? अतृप्तींतही निराशा आणि तृप्तीनंतर असमाधान हेंच ज्याचें स्वरूप त्या या प्रेमाच्या खेळामध्यें खरोखरच कांहीं स्वारस्य असेल का? पण हें प्रेम तरी होतें का? हॅर्टीचें असेल, पण माझें? हॅर्टीचें सुद्धां असेल असें म्हणण्यांत काय अर्थ आहे? काल ओळख नव्हती, आणि आज कसलाहि अंतराय उरला नाहीं, असें वागणारी मुशाफरीं-तली सोबतीण ती, काय तिचा भरंवसा? पण भरंवसा हवाच कशाला? केवळ मौज म्हणून ती खेळत असेल तर डाव रंगविण्याइतका मी तरबेज होतों. प्रहराच्या ओळखी, घटकेची मैत्री आणि पळाची प्रीति! निरोप घेतला कीं दुसरा दिवसहि नवा आणि रात्रहि नवी, असें माझ्या आयुष्यांत थोडथोडकें झालें नव्हतें. परवां पोर्ट सैद. आठवड्यानें मुंबई. नंतर विस्मृतीच्या टोपलींत ज्या अनेक मुलींचीं नांवें, चिठ्ठया आणि पत्रें यांचा केर मीं फेंकला होता त्यांतच एक हॅर्टीचें नांव जास्त! त्याचा विचार तो कसला करायचा! अखेर कालची रात्रसुद्धां सुंदर. पॅरिसची रात्रसुद्धां सुंदर असते, पण दुसऱ्या दिवशीं त्यावर कोणी विचार करतो कीं काय?

मी ब्रश धुतला, वस्तरा साफ केला, तोंड अर्धवट भिजवलें व पुसून काढलें. क्रीम लावलें. स्नानाला बाहेर जायचें होतें. केंस विसकटलेले होते. त्यांतून कंगवा फिरवूं लागलों. आरशांत पहातां

पहातां चेहेऱ्याकडे लक्ष जायला लागलें. माझे डोळे पहाणाराचा ठाव घेणारे आहेत. श्रीमंतीची कांति चेहऱ्यावर दिसे. त्यांतच तारुण्याची भर. मऊ रेशमासारखे केंस. ओंठावर विलासी वृत्ती झळके. हनुवटी करारी होती. चेहऱ्यांत व्यक्तिमत्व होतें. उमा नेहमीं म्हणे, "तुझ्या पहिल्याच दर्शनानें ऊर दडपून गेले. कसली तरी भीति वाटे!" प्रीतीच्या पोटीं लपविण्याची ती भीति होती. एकदम विचार मनांत आला. उमेचा आपल्याला अनुभव आहे. इतरहि कांहीं मुली याच चेहेऱ्यानें आकर्षित झाल्या. आज हॅर्टा तरी नुसती खेळते आहे कशावरून? बिचारी खरेंच भुलली असली, अनेक इतिहासांची पुन्हां पुनरावृत्ति झाली तर? हॅर्टाला हा चेहरा पाहून भीति उपजल्याचें तिनें सांगितलें नाहीं खरें; पण प्रीतीची कबुली तिनें दिली ना? ती खोटी कशावरून?

मनाचा गोंधळ उडाला. केंस फिरवले. स्लीपर्स चढविले. टॉवेल घेतला. साबण, स्पंज, सगळें घेऊन बाहेर पडलों. स्नानाच्या खोलींत गेलों. थंड आणि गरम पाण्याचे नळ होते. पाणी मिसळून कोमट करून टबांत सोडलें. सिगरेट शिलगावली आणि त्या पाण्याच्या धारेकडे बघत स्टुलावर बसलों.

असेल हॅर्टाचें प्रेम. कदाचित् खेळवलीहि जाईल. मुंबईला मी उतरून जाईन आणि सुटेन. मागें कांहीं कां होईना? स्त्रियांच्या निष्ठेवर माझा विश्वास नव्हता. प्रीतीच्या खेळांत स्त्रिया पडल्या, आपटल्या तरी पटकोडग्यासारख्या पुन्हां उठून बसूं शकतात हें मला ठाऊक होतें. हॅर्टाची काय एवढी काळजी करायची? आज हंसेल, नाचेल, खेळेल; उद्यां थोडेंसें रडेल; पुन्हां कोलंबोला नवीन दोस्त मिळवील. उमेचे शब्द पुष्कळदां आठवत. "तुझ्यावरचें प्रेम खोटें नव्हतें आणि नाहींहि. पण मी दुसऱ्याच्या प्रेमांत सांपडलें आहें. मनानें फार क्लेश भोगले. तुला दिसते तर तूं क्षमा केली असतीस." क्लेश? तेव्हांच मी म्हटलें होतें, 'प्रेमाचं नाटक केलंस तेवढं पुरे. आतां क्लेशाचं तरी करूं नको.' स्त्रियांना खरोखरच कधीं क्लेश होतात का? मागें मानसशास्त्रावर मी एका जर्मन लेखकाचें पुस्तक वाचलें होतें. प्रेमनिराशेनें नव्हे, शास्त्रीय तर्कवादानें त्यानें असें म्हणणें मांडलें होतें कीं, स्त्रीजात निष्ठुर, दयामाया

मुळींच नसलेली, अत्यंत क्रूर अशी मूळचीच आहे! स्त्रिया उत्तम नर्सेस होतात याचें कारण हेंच. आजाराचे, अपघातांचे, शस्त्रक्रियेचे सगळे अत्याचार त्यांच्यानें बघवतात – आम्हां पुरुषांच्यानें ते बघवत नाहींत. म्हणूनच असल्या वातावरणांत राहून स्त्रिया उत्तम नर्सेस होऊं शकतात! प्रेम असलें आणि वियोग झाला तरी हॅर्टा खास मरणार नाहीं!

हॅर्टा मरणार नाही, पण आपण? मला स्वतःशीं कबूल करणें भाग होतें. कुसुमच्या नंतर घेतलेल्या अनेक अनुभवांचा थिल्लरपणा हॅर्टाच्या मैत्रीच्या वेळीं माझ्या प्रत्ययाला आला नव्हता. कदाचित् माझी सुद्धां ओढ खरी असेल. मला तिचें स्वरूप कळलें नसेल अजून. मी पुन्हा या पाशांत फसणार आहें का? पण फसणार म्हणजे काय? माझ्यांत अनुभवाच्या कडूपणाचा विषार होता. दारूचा पहिला पेला घेतल्यानंतर तरतरी येऊं लागते ती दारूवर अवलंबून असते, कोणच्या दुकानांत आपण पितों यावर मुळींच अवलंबून नसते! स्त्रीसहवासाच्या कल्पनेनें वृत्तींना येणारी उत्तेजता तशीच सुखद असते. तरी ती सहवास होण्याच्या घटनेवर अवलंबून असते, विशिष्ट स्त्रीवर अवलंबून असतेच असें नाहीं, असें माझें मत झालें होतें. हॅर्टाच्या ऐवजीं ती पोल मुलगी माझी मैत्रीण झाली असती तर? बहुधा कांहीं फरक झाला नसता!!

मनानें एकदां दोनदां पुन्हा विचारण्याचा प्रयत्न केला, खरंच झाला नसता का? पण माझा निर्णय झाला होता. खेळायचेंच असेल तर खेळूं या. माझी काळजी मी घेईन. हॅर्टानें स्वतःची घ्यावी. तिची जबाबदारी माझ्यावर नाही.

सिगरेट संपली. मी कपडे काढले आणि स्नानाला सुरवात केली.

## —१६—

बोट किती वाजतां पोर्ट सैदला पोंचणार तें नक्की कळेना. कुणी बातमी आणली. रात्रीं दोन वाजतां बंदराला लागणार. सगळ्यांचा तर्क होता, दहाच्या सुमारास पोहोंचूं. त्यामुळें जो तो बेत ठरवीत होता. सामान विकत घ्यायचें

पत्रें टाकायचीं, तारा करायच्या, नुसतें फिरायचें. मुरब्बी होते त्यांनीं टोळ्या ठरविल्या. आरब टाउनमधें जायचें आणि धुमाकूळ घालायचा ! त्यासंबंधींच्या योजना गुप्तपणें आंखूनहि टाकल्या ! खलाशांचीं आणि मुशाफरांचीं घरें प्रत्येक बंदरालाच असतात. पण पोर्ट सैद हा खुशालचेंडू प्रवाशांनाहि रंग-महाल वाटतो !

दोन वाजण्याच्या बातमीनें बहुतेकांचा विरस झाला. पण उत्साह कमी झाला नाहीं. सारखे बोटीवरच राहून कंटाळा आला होता. निदान पाय तरी मोकळे करायला मिळतील म्हणून सगळे आतुर होते.

दुपारचा चहा घेऊन सगळे वर आलों. इतक्यांत पहिल्या वर्गाचा एक परिचारक आला. सगळ्या नोटिसी, जाहिराती, बोटीवरचीं वर्तमानपत्रें तोच आणीत असे. त्यानें येऊन नकाशाची चौकट उघडली. बोट कुठवर आली आहे हें रोज दाखविणारें टांचणीचें लहानसें निशाण त्या नकाशावर लावीत. आदल्या दिवशीं टोंचून ठेवलेलें निशाण त्यानें काढलें. हातांतल्या चिठ्ठीवर अक्षांश–रेखांश लिहिले होते ते बघून पुन्हां निशाण पुढें टोंचलें.

भोंवतालीं सगळे जमले. बहुतेक सगळे यहुदीच. मी मागच्या खुर्चीवर बसलों होतों. गर्दी गेल्यावर बघूं म्हणून विचार होता. कायटेलनें निशाणा-पासून पोर्ट सैदपर्यंतचें अंतर मोजलें. हिशोब केला व वळून म्हटले, " सुमारें १७५ मैल. म्हणजे पोर्ट सैद यायला बारा एक तरी वाजणारच. "

सगळे हळुहळू पांगले. कायटेल उभाच होता. नकाशाकडे निरखून बघत होता. मी उठलों. मागें उभा राहिलों. त्याच्या हातांत पेन्सिल होती. चारी खंडांतून नकाशावर ती तो फिरवी. जलमार्ग, विमानांचे मार्ग, वाटेंतलीं बंदरें, देशदेशचे पर्वत, नद्या, सगळें तो न्याहाळीत होता.

रोज पुष्कळदां मी त्याला तेथें बघें. मीं त्याला म्हटलें, " काय बघतां आहां ? "

तो दचकला. माझ्याकडे वळला आणि म्हणाला, " आपण कोणच्या रस्त्यानें जाणार तें पहातों आहें. "

मीं म्हटलें, " तुम्ही आफ्रिकेचीं बंदरें बघतां आहां, अरेबियांतल्या नद्या पहाता आहां, हिंदुस्थानांतलीं शहरं, चीनांतले डोंगर, रेलवे मार्ग सगळं न्याहाळून पहातां आहां. हा सगळा कांहीं आपल्या प्रवासाचा मार्ग नव्हे. "

" नव्हे खराच," त्यानें हंसून म्हटलें, " पण मी युरोपकडे पेन्सिल फिरविली नाहीं, तुम्हीं पाहिलंत ना ? रोज मी इथं उभा राहतों. आमच्यापैकीं पुष्कळ जण असंच बघत बसतात. प्रत्येक नवा देश, नवं बंदर, नवं शहर. नांव वाचतों आणि मनांत कल्पना येते. इथं जातां येईल का ? पोट भरतां येईल का ? घर करतां येईल का ? "

पुन्हां सगळं संभाषण रोजच्या कहाणीकडे वळणार असें वाटून मी म्हटलें, " बाकी इथं उभं राहून तुम्हाला आतां एकदम वाटत असेल, जग किती अफाट आहे ? एक देश सुटला तरी स्वातंत्र्य हरपलं असं नाही. कुठंहि रहातां येईल, कसंहि जगतां येईल. "

बोलत बोलत आम्ही खुर्च्यांवर बसलों. मार्थाची आई जवळच होती. मीं तिला हंसत हंसत म्हटलें, " तुम्ही पाहिलात ना हा नकाशा ? कुठल्या देशांत राहणं तुम्हाला आवडेल ?"

कायटेलनें भाषांतर करून सांगितल्यावर तिनें जर्मनमध्यें उत्तर दिले, " माझ्या आवडीचं काय ? कुठंहि राहूं देतील तिथं राहूं. "

मीं म्हटलं, "असं कां म्हणतां ? हे रंग बघा. किती निरनिराळे आहेत ? नवे देश, नवीं राज्यं. यांत नाझी अम्मलाचा रंग सगळ्या नकाशांत किती थोडा आहे ? कुठंहि तुम्ही राहूं शकाल. जर्मनीपेक्षां सुंदर, समृद्ध, चांगले असे अनेक देश आहेत. सांगा बघूं. तुम्ही सांगाल तिथं मी तुम्हांला सोडतों. कुठं जायचं ? "

कायटेल हंसला व म्हणाला, " तुम्ही म्हणतां तशी कल्पना एखाद वेळीं मनांत येते आणि मग विचार करूं लागतों. एक एक अडचणी डोळ्यापुढं येतात. असतात लहान लहानच. पण सगळं कठिण वाटायला लागतं. समजा, इजिप्तमधं राह्यला मिळालं तर ? पण उन्हाची भीति वाटते. हिंदुस्थानचंहि

असंच. दिल्ली लाहोर असलीं नांवं मी ऐकलीं आहेत. पण ऊन खूप असतं म्हणतात. जगणं सुद्धां अशक्य व्हायचं एखादवेळीं. ”

मीं म्हटलें, “ उन्हाची कसली भीति ? माझ्याकडे बघा. माझ्या गांवाला उन्हाळ्यांत ११०° वर टेंपरेचर जातं. तरी मी जीवंत आहें. ”

त्यानें एकदम उद्गार काढला, “ Christ! ११०° सावलीमधं ? ” त्या बाईच्या तर अंगावर कांटा आला. कायटेल पुढें म्हणाला, “आज सकाळीं खलाशी बोलत होते. तांबड्या समुद्रांत ऊन फार. भोवतालीं सगळं वाळवंट. वारे होरपळणारे असतात. खरं का ? ”

त्याचा चेहरा गांगरल्यासारखा झाला होता. मीं समजूत घालीत म्हटलें, “ कांहीसुद्धां होत नाहीं. तुम्ही उगीच भितां. युरोपिअनांची वस्ती आफ्रिकेंत सुद्धां नाहीं कां ? ”

त्यानें उत्तर दिलें, “ तें खरं हो. पण एकांतून दुसरं, असल्या अनेक अडचणी निघतात. वय तरुण असलं तर कांही तरी बरं. ही म्हातारी, हॅर्टीची आई, या जगतील म्हणतां उन्हांत ? माझ्या मनांत विचार येतो. समजा, पोर्ट सैदला किंवा एडनला उतरलों. जवळ कपडे आहेत ते सगळे थंडीचे. ऊन म्हणजे नवे कपडे पाहिजेत. कुठून आणायचे पैसे ? ”

माझ्यापुढें चित्रें उभीं राहिलीं. खरेंच यांचें उतरणें राहाणें म्हणजे चैनींत फिरणें नव्हे. जन्मभर राह्यचं, धडपडायचं आणि दारिद्र्यांत जगायचं !

तरी धीर देत म्हटलें, “तुम्ही उगीच भितां. सगळीकडे ऊनच असतं असं नाहीं. ”

तो म्हणाला, “ मला ठाऊक आहे. म्हणूनच गांवं बघतों. भोंवतालीं पर्वत, नद्या कुठं आहेत तें बघतों. त्यावरून हवा कशी असेल याचे तर्क करीत बसतों. शांघायला जातों आहे ना ! मला तिथला सगळा भूगोल पाठ झाला आहे ! ”

मार्था आली होती. तिचें आणि आईचें भांडण चाललें होतें. तिला मदनानीबरोबर पोर्ट सैदला उतरायचें होतें. तिथून तीं दोघेंहि मोटरनें कैरोला

जाऊन सुवेझला पुन्हां बोटींवर येणार होतीं. म्हातारी कबूल होईना. शेवटीं मार्था फणकाऱ्याने “ मी जाणारच ” म्हणून निघून गेली.

मी उठलों. कायटेलला विचारलें, “ तुम्ही रात्रीं पोर्ट सैद बघायला उतरणार ना ? ”

त्यानें म्हटलें, “ नक्की नाहीं. ”

मी एकदम म्हटलें, “ वा: असें कसें ? पॅलेस्टाईन इथून जवळच आहे. वास्तविक तुम्ही उतरून कांहीं दिवस राहून पॅलेस्टाईन बघायला पाहिजे. ”

पॅलेस्टाईनचें नांव ऐकून मार्थाच्या आईनें मान वर केली. कायटेलनें सांगितल्यावर ती म्हणाली, “ तुम्ही मघांशी विचारलंत ना ? कुठं रहावसं वाटतं ? मला आतां वीट आला आहे सगळ्याचा. सगळं सोडून द्यावं, पॅलेस्टाईनच्या पवित्र भूमींत मरावं आणि पुरलं जावं, एवढी एकच इच्छा उरली आहे. ”

—१७—

लुईचें मला पुष्कळदां हंसूं येते. स्वभाव भारी खोडकर असेच. पण त्याच्या खोड्या मोठ्या विचित्र असत. वयाने मोठा असता तर त्याचे चाळे मोठ्या गंमतीचे वाटले असते. मुद्दाम उपहास करणारे असे वाटले असते. शिंदे तर त्याला युरोपीय सभ्यतेला वांकुल्या दाखविणारा हुषार विदुषक समजत. आणि खरंच, त्याच्या कांही चाळ्यांचा अर्थ लावणें कठिण होते. त्याला ‘Good Morning लुई’ म्हणावे, हस्तांदोलनासाठी हात पुढें करावा, ते नाकारून तो नाझी सलामी देई, हात वर उचली. पण त्यांत आविर्भाव असा असे की थप्पड मारायला निघाला आहे ! स्वागताची एक तऱ्हा युरोपांत आहे. भेटलें कीं स्मित करायचें. पुष्कळदां तें इतकें कृत्रिम असतें कीं खिजवल्यासारखें वाटावें. पण हंसायचें आणि पुन्हां गंभीर व्हायचे ही रीतच ! लुईची आई बिचारी भेटल्याबरोबर असेंच हंसे. हे राजश्री त्यावेळीं मुद्दाम दांत विचकीत, पुन्हां गंभीर होत आणि आईकडे बघत. प्रथम मला त्याचा

अर्थच कळेना. नंतर ध्यानांत आलें. त्याच्या आईचा चेहरा एरवीं गोड हंसतमुख असे. पण ह्या कृत्रिम स्वागताचें तिचें स्मितच तेवढें भारी विद्रूप दिसे. त्यामुळें तें त्या बालकाच्या मनांत कायमचें ठसलें असावें. एरवीं त्याच्या सुंदर चेहेऱ्याला असलें विद्रूप हंसणें प्रयत्न करूनहि साधणे कठिण होतें. त्या रात्रीं नाच होता. मंडलच्या बरोबर त्याची आई मनसोक्त नाचली. आनंदाचे क्षण मनापासून जगून आहेत त्यापेक्षां मोठे ( किंवा लांब ) करावे अशीच सगळ्या ज्यूंची मनस्थिति होती. तिला मंडलबद्दल भारी कृतज्ञता वाटली. नाच संपल्यावर निरोप घेतांना तिनें मंडलचे फार मनापासून आभार मानले. मंडलचेंहि मन द्रवलें. त्यानें ' pleasure ' म्हणून औदार्यानें वांकून तिचा हात उचलला आणि तोंडाशी नेऊन त्याचें चुंबन घेतले. लुई कडेवर होता. त्यालाहि ' Good-night ' म्हणून मंडलनें हस्तांदोलनासाठी हात पुढे केला. राजश्रीने सभ्यपणे तो हात घेऊन त्याच्या पाठीवर कडकडून चावा घेतला ! त्या मुक्याची ही परतफेड होती, परक्या स्त्रीच्या हाताचें चुंबन घेण्याच्या चालीचा तो भयंकर निषेध होता, की आपल्या आईच्या असहायतेचा त्याने फायदा घेतला असें वाटून त्याचा सूड त्याने घेतला, हें मला कांहींच कळलें नाहीं. पण शिंदे मागें होते त्यांना मनस्वी हंसू आलें आणि आनंद झाला. त्यांनी प्रेमभरानें त्याला एकदम जवळ घेतले व मला म्हणाले, “ संभाळा हं. बायकांशीं लघळपणा करणाऱ्यांचा लहान ज्यूंनासुद्धां राग येतो ! ” मीं हंसून म्हटले, “ येत असेल, पण त्याचा माझ्याशीं काय संबंध?” “तुमच्यावर माझा डोळा आहे हे ध्यानांत असू द्या.” मीं म्हटलें, “ तुमच्यावरहि माझा आहे ! ” “ म्हणजे ? ” “ परवांचं वाक्य आठवतं ना ? Good boy, better mummy ! लुईचं कौतुक आणि आईशीं सलगी !” शिंदे मोठ्यानें हंसले आणि म्हणाले, “ त्याची नका काळजी करूं. लुई आपल्या आईचा पहारेकरी आहे. मी थोडा अधिकपणा केला तर तो मला कडकडून चावेल. होय ना रे लुई ? ”

लुईने मान हलवली. त्याच्या टाळूवर मधोमध कुरळ्या केसांची एक स्प्रिंगसारखी रांग होती ती थरथरली. अस्सल जर्मनमध्यें त्यानें होकार देऊन

म्हटलें, "या." शिंद्यांनीं त्याला गुदगुल्या केल्या व म्हटलें, " लेकाचा एक शब्द इंग्रजी बोलेल तर शपथ ! लुई, yes म्हण. say yes." पण लुईला आतां माहित झालें होतें. इंग्रजी बोलण्याचें टाळणें हा त्याच्या खोडकरपणाचाच एक भाग झाला होता. त्यानें 'yes' म्हणण्याचें नाकारलें. त्याबरोबर शिंद्यांनीं त्याचा गालगुचा घेतला व म्हटलें, " थांब हं गुलामा, तुला आज इंग्रजी बोलायला लावतोंच."

नंतर त्याला घेऊन ते पिआनोजवळ गेले. त्याला मांडीवर घेतलें. पिआनो उघडला आणि वाजवायला सुरुवात केली.

थोड्याच वेळांत त्या मधुर स्वरांनीं जोडपीं आकर्षित झालीं. नाचाला सुरुवात झाली. लय वाढूं लागली. लुई आनंदानें टाळ्या वाजवूं लागला. मीं त्याला उचललें. कडेवर घेतले. त्याचा एक हात माझ्या हातांत घेतला. दुसऱ्यानें त्याला छातीशी धरलें. आणि नृत्यांत सामील झालों.

नृत्य भरांत आलें. शिंद्यांनाहि स्फुरण चढलें. लुईच्या मनांतले कोंदटलेले आनंदाचे प्रवाह मोकळे सुटले. तो हर्षानें चीत्कार करी. सगळ्यांच्या मनांतल्या सुखसीमेच्या भावनेचा तो उद्गार वाटे !

पिआनो थांबला. लुईला मी खालीं सोडलें. तो धांवत शिंद्यांकडे गेला. त्यानें पुन्हां पिआनो वाजवण्याचा आग्रह केला. शिंद्यांनीं त्याला म्हटलें, " लुई, मी पिआनो वाजवूं का ? "

त्यानें आनंदानें मान हलवली व म्हटलें, " या ! या ! " शिंद्यांनीं एक बोट पिआनोवर ठेवलें. म्हटलें, " 'या' नव्हे. इंग्रजींत होय म्हण. Yes. म्हण. " त्यानें एकदम म्हटलें, " Yes, Yes. "

एकदोनदां बोटें फिरवून ते पुन्हां थांबले. व म्हणाले, " आणखी वाजवूं ? "

" या !" नंतर त्यांच्या निषेधाच्या नजरेकडे बघून म्हणाला, " Yes ! "

" मग म्हण तर Uncle, play piano !"

पडेल ती किंमत देण्याच्या तयारीनें त्यानें म्हटलें " Uncle, play piano ! "

शिंद्यांनीं विजय मिळविला होता ! त्याच्या विरोधाच्या सगळ्या भावनांना मागें रेटीत ते म्हणाले

" म्हण I like piano."

" I like piano."

" I like English!"

" I like English."

" Very much."

" Very much."

त्यांचें मन त्याच्या लाचारीनें द्रवलें. त्याला जवळ घेऊन ते एकदम प्रेमभरानें म्हणाले, " Ah, baby, I like you!"

पण लुईला तें कळलें नाहीं. त्यानेंहि शिंद्यांना म्हटलें, " Baby, I like you!!"

संगीताच्या भुलावणींत त्याचें भान हरपलें होतें. त्याच्या अभिमानाच्या, हट्टीपणाच्या, डॉईशविषयींच्या आपलेपणाच्या सगळ्या विरोधी वृत्ति विरल्या. सगळ्यांना हंसूं आलें. शिंद्यांनीं त्याला वर उचलून घेतलें. मला म्हणाले, " आतां सकाळपर्यंत याला इंग्रजीचा प्रोफेसर बनवून सोडतों !"

मी म्हटलें, " सकाळपर्यंत ? म्हणजे तुम्हीं पोर्ट सैदला बंदरावर येत नाहीं का ?"

" येत नाहीं कसा ? यालाहि घेऊन जाऊं ! होय नारे लुई ? म्हण Yes!"

त्यानें आनंदानें संमति दिली. माझ्या खांद्याला मागून स्पर्श झाला. मी वळून पाहिलें. हॅर्टा उभी होती.

तिचा वेष बघून मला आश्चर्य वाटलें. केंस नीट बसविले होते. फुलांची फीत चिंधीसारखी बांधलेली होती. अंगांत तलम रेशमी झगा पायघोळ होता. खांदे, पाठ, गळा, उरापर्यंतचा भाग मोकळाच होता. खांद्यावरून काळी फर पांघरली होती. छातीशीं लहानसें फूल टांचणीनें टोंचलें होतें. तें थरथरत होतें.

बरोबर मन्नान होता. त्यानें रात्रींच्या जेवणाच्या वेळचा सूट घातला होता. दोघेंहि नृत्याच्या तयारीने आलेलीं दिसत होतीं.

तिनें नुसतें माझ्याकडे पाहिलें. त्यांत रूपाचा अभिमान होता. मला विचारलें, "मला तुम्हांला कांहीं विचारायचं आहे ? काय असेल ओळखा ?"

मन्नानच्या कपाळाला आंठ्या चढल्या. माझ्याशीं तिची सलगी त्याला आवडत नसे. मी मुद्दामच म्हटलें, "माझ्याबरोबर नाचतां का असं तुम्हांला विचारायचं असेल तर त्याचा उपयोग नाहीं. मला नाचतां येत नाहीं !"

तिनें हात धरून मला एका टेबलापाशीं नेलें. तिथे बसविलें. मन्नानहि बसला. मला म्हणाली, "ते नाहीं विचारीत. मी प्रत्येकाला तोच प्रश्न विचारतें आहे ! मिस्टर मन्नानलाहि विचारलं. तुम्हांलाहि विचारतें. मी कशी दिसतें सांगा बघूं."

मी तिच्याकडे बघत म्हटले, "तुमचे कपडे सांपडल्यासारख्या दिसतां !"

ती एकदम गंभीर झाली. मन्नान माझ्याकडे वळून म्हणाला, "तुम्ही फ्राउलाइनचा अपमान करण्याच्या बेतांत आहां !"

मी खुर्चीवरून उठलों. दोघांनाहि म्हटलें, "माफ करा. फ्राउलाइनचा अपमान करण्याची कल्पना मला येणं शक्य नाहीं. तुमचे कपडे हरवले होते. ते सांपडले याचा मला आनंद झाला. तोच मी बोलून दाखविला एवढंच !" असें म्हणून मी वळलों, गुडनाइट केलें आणि पानगृहाच्या बाहेर पडलों.

मी डेकवर उभा होतों. पोर्ट सैद जवळ येत होतें. समुद्र लहान होऊन जमिनीच्या कुशींत शिरत होता. पाहतां पाहतां तिच्यावर दीपकळ्यांचे रोमांच उठूं लागले. थोड्याच वेळांत पोर्ट सैदचें बंदर तरंगत बोटीकडे आलें.

हॅर्टा जवळ येऊन उभी राहिली होती. ती म्हणाली, "तुला एक गोष्ट सांगायची आहे, बॉब !"

तिच्याकडे न बघतां मी विचारलें, "काय ?"

" थांब मी कुणी ऐकतं आहे कां बघतें ! " असें म्हणून तिनें चहूंकडे पाहिलें. नंतर गंभीरपणानें माझा हात धरला व अगदीं हलक्या स्वरांत म्हटलें, " सांगतें. पण तूं कुणाजवळ बोलायचं नाहीस ! "

" बहुतेक नाहीं. "

" बॉब, कुणाला सांगूं नकोस. तूं मला मुळींच आवडत नाहीस ! "

मी तिला म्हटलं, "कुणाला सांगणार नाही, पण एका माणसाला सांगायची इच्छा आहे. "

" कुणाला ? "

" मि. मन्नान यांना ! "

तिने टंवकारून माझ्याकडे पाहिलें. माझे खांदे धरले. हळूच चुंबन घेतलें व म्हटलें, " आतां मला किती बरं वाटतं ! तुला मत्सर वाटायला लागला ना ? तुला खूप छळावंसं वाटतं मला. मघाशी इतका वेळ मी तुझी डेकवर वाट बघत होतें. अन् तूं आला नाहीस, नाही का ? "

तिला दूर करीत मीं म्हटलं, " खोटं. मी वर येऊन गेलों. तुला खूप शोधलं. तूं डेकवर नव्हतीस. "

" जेवण झाल्यापासून दोन तास त्या समोरच्या खांबाशी मी उभी होतें ! "

" असशील. पण अंधारांत ओळखायचं कसं ? डोक्यावर दीपगृहासारखा दिवा घेऊन ठेवायचा असतास ! "

ती थोडी दूर सरकली. बाहेर बघूं लागली. नंतर म्हणाली, " आपलं माणूस ओळखायला चेहेराच दिसावा लागतो का ? आवडीचं असलं म्हणजे त्याच्या शरीराची, साध्या हालचालीची रेषान्‌रेषा मनांत जीवंत असते. इथं आतां कमी का अंधार आहे ? पण मी कशी नेमकी तुझ्याजवळ आलें ? मी तुला आवडतच नाही मुळीं ! "

पाईप विझवून मीं खिशांत ठेवला व म्हटलें, " मुळींच आवडत नाहींस ! " आणि तिला जवळ घेतले.

थोड्या वेळानें तिनें विचारलें, " मी मिस्टर मन्नानला विचारलें, मी कशी दिसतें सांग. त्यानें सांगितलें, फार सुंदर दिसतेस. तुला कशी दिसतें तें सांग!"

मीं सहज म्हटलें, " कांहीं विशेष नाहीं दिसत बुवा. माणसासारखी माणूस दिसतेस तूं एवढेंच ! "

तिचा चेहरा एकदम उत्तेजित झाला. मला धरून ती म्हणाली, " बॉब, तूं मनकवडा आहेस खास ! मला हेंच वाटतं आहे ! मी माणूस झालें आहें ! चार पांच वर्षं विसर पडला होता ! वाटे, आपण क्षुद्रांतल्या क्षुद्र जंतूपेक्षांहि हीन आहोंत. बोटीवर पाय ठेवला. स्वतंत्रतेचं वारं भोगायला मिळालं. त्यावर विश्वास बसेना. इथं सगळे ओळखतात, विचारपूस करतात, माझ्याशीं बोलतात, हंसतात, खेळतात. तूं माझं कौतुक करतोस, काळजी घेतोस ! बोल, आतां मी माणूस, जीवंत माणूस झालें आहे ! "

मी चकित झालों. तिचा आवेश वाढत होता. माझ्या खांद्यावर तिनें मान टाकली बोलायला सुरुवात केली, " आज माझं सामान सांपडलं. कपडे सांपडले. आतां पोर्ट सैदला आपण उतरूं. सुखाचीं सगळी साधनं हातांत आलीं आहेत. मी सुखी होण्यासाठीं सज्ज झाले आहें. आपण उतरूं. खूप फिरूं, धांवूं, खेळूं. माझ्या मनांत काय काय करायचं याची यादी पाठ आहे. कॅफेमधें पेयं घेऊं. थिएटरमधें खेळ बघूं. कबरेजमध्यें जाऊन नाचूं. खूप कैफ चढला म्हणजे रात्रीच्या शांत रस्त्यांतून धांवत फिरूं. समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊं. मी तुझ्याजवळ उभी राहीन. लेसेप्सच्या पुतळ्यासारखं बोट समोर करून मी म्हणेन, बॉब, हा सुवेझचा कालवा, पूर्वेचं दार. जर्मनी मागें गेला. युरोप मागं गेलं. छळाच्या, द्वेषाच्या, सूडाच्या आधारावर जगणारी, विजय मिळवूं पहाणारी संस्कृति मागें गेली. आतां मी नव्या खंडांत जातें आहें. ही पूर्व. इकडेच आमच्या सुखाचा सूर्य पुन्हां उगवेल ! "

मी तिला सावरून धरलें. जहाज थांबलें होतें. लहान लहान होडकीं येऊन बोटीला बिलगली होती. त्यांतून माल विकूं पहाणाऱ्या इजिप्शिअन व्यापाऱ्यांची आरडाओरड चालू होती.

आम्ही बाहेर जाण्यासाठीं निघालों. मी हॅटीला सांगितलें, " मन्नानला वाईट वाटेल. तूं लाँचमधून त्याच्याबरोबर धक्क्यावर जा. तिथंच मी तुझी वाट बघतों. "

## —१८—

पोर्ट सैद बंदराला धक्का नाही. बोट दूर उभी रहाते. मोटर लाँच करून बंदरावर जायचे; पुन्हां तसेंच परत यायचें.

सगळे तयार झाले होते. कायटेलहि उभा होता. मीं विचारलें, " तुम्ही येणार नव्हतां ना ? "

त्यानें हंसून उत्तर दिलें, " मी चौकशी केली. मोटर लाँचेसचें भाडे द्यावें लागत नाहीं. फुकट नेतात, फुकट आणून पोंचवितात. आतां अडचण उरली नाही. "

सगळे जर्मन लगबगींत होते. उतरण्यासाठीं उत्सुक झाले होते. शिंद्यांनीं लुईला कडेवर घेतलें. त्याच्या अंगांत पातळ नेव्ही ब्ल्यूचा पोषाख होता. लुईची आई ज्यूमंडळींत होती. त्यांतच हॅटी. मन्नानहि होता.

बोटींत मनस्वी उकडत होतें. वरच्या डेकवर आलों. तिथें एकदम गार वाटलें. मी लुईच्या आईला सांगितलें, " उशीर होईल. आधीच गारठा आहे. लुईला पांघरण्यासाठीं घेऊन ठेवा. आम्ही जिन्यावरून खालीं जातो. लवकर आलांत तर पहिल्याच लाँचमधें जागा मिळवूं. "

पहिल्याच वर्गाच्या डेकवर गर्दी उसळली होती. युनिफॉर्ममधले अधिकारी, तुर्की टोप्यांतले कस्टम्सचे अधिकारी, पासपोर्टचे अधिकारी. सगळ्या प्रवाशांचे झाकीचे पोषाख. ज्याची त्याची खालीं जाण्यासाठीं एकच गडबड होती. उतरण्यासाठीं जिना लावला होता. आम्ही रांगेंत उभे राहिलों. आमची पाळी आली. शिंदे माझ्यामागेंच होते. मी पासपोर्ट दाखविला. उतरण्याच्या परवान्याचें कार्ड मिळालें. जिन्यावर गेलों. शिंद्यांनीं पासपोर्ट

दाखविला. अधिकाऱ्यानें लुईबद्दल विचारलें. शिंद्यांनी सांगितलें, त्याची आई मागून येते आहे. मला लाँचमध्यें जागा मिळवायची आहे.

त्यानें थोडी कुरकुर केली. पण शिंद्यांची सुटका झाली. फळ्यांच्या आणि दोऱ्यांच्या जिन्यावरून जपून उतरत आम्ही खाली आलों.

तळाशी लहानशा फळ्यांचा तरता तक्ता समुद्रांत टाकला होता. त्यालाच लागून लाँच होती. हात अवघडला होता. म्हणून शिंदे एकदम लाँचमध्यें जाऊन बसले. लुई आनंदांत होता. शिंद्यांनी कोपऱ्यांतली जागा गांठली आणि त्याला खालीं ठेवलें. प्रवाशांची रांग जिन्यावरून उतरत होती. मोटर लाँच भरत आली. लुईची आई दिसेना. लहानग्या तक्त्यावर गर्दी झाली. लाँच भरली. शिंदे काळजीनें वर बघत होते. परत फिरायला जागा नव्हती. मी ओरडून सांगितले, "काळजी करूं नका. तुम्ही पुढे व्हा. मी तिला घेऊन येतों."

लाँच सुटली.

तक्त्यावर गर्दी. जिन्यावर गर्दी. मला वर जायला मिळेना. दुसरी लाँच आली. प्रवासी चढत होते. माझ्याजवळ एक इंग्रज उभा होता. डिनर सूट. डोळे दारूमुळें लाल. एकाएकीं त्याला झीट आली. तो माझ्या अंगावर पडला. त्याला सावरून धरलें. खालीं निजवलें. त्याला आंकड्या येऊं लागल्या. एकच गोंधळ झाला. वर बघून सगळे बोटीच्या डॉक्टरच्या नांवानें हांका मारूं लागले.

मी त्याच्या टायची गांठ सोडली. कॉलर तंग होती. ती तोडून गळा मोकळा केला. पाणी घेऊन तोंडावर हबके मारूं लागलों. लाँचेस् आल्या आणि गेल्या. माझें लक्षच नव्हतें. तो सावध झाला. तेव्हां मी वर पाहिलें. एक लाँच नुकतीच सुटली होती.

गर्दी संपली होती. जिन्याच्या वर टोंकाला एक इजिप्शिअन शिपाई रेलून उभा होता. जवळच पांढऱ्या गणवेषांत एक बोटीचा अधिकारी. जिन्यावर आतां कोणी नव्हतें. जवळच्या खलाशाला मीं विचारलें, "लाँच किती वेळानें येईल?" त्यानें उत्तर दिलें. "अर्ध्या तासानें."

मी वर गेलों. डेकवर पाय टाकला. परिचारकानें विचारलें, " गेलां नाहींत ? " मीं मान हलवली. आंत वळलों.

इतक्यांत कुणीसें स्त्रीनें म्हटलें, " Hullo ! " ती लुईची आई. लगबगीनें तिच्याकडे गेलों आणि म्हटलें, " शाबास ! किती उशीर केलात ? चला ! "

पण ती बघतच होती. मला आश्चर्य वाटलें. मी विचारलें, " हें काय ? तुम्ही बोलत कां नाहीं ? थंडी पडली आहे. लुईला पांघरायला द्यायला पाहिजे लवकर. चला ना ! "

तिनें विचारलें, " कुठं जायचं ? "

" बंदरावर. "

" पण जाऊं देत नाहीत. " ती रडकुंडी झाली होती.

" म्हणजे ? कोण म्हणतं ? "

" सगळेच. "

मी थक्क झालों. म्हटलं, " तुमचा पासपोर्ट आहे ना ? चला तर. असं शक्यच नाहीं. "

तिचा हात हातांत घेतला. आम्हीं जिन्याच्या तोंडाशीं गेलों. मघाचाच अधिकारी, मघाचींच प्रश्नोत्तरें. "पासपोर्ट ?" मी पुस्तक पुढें केलें. त्यानें वरचीं सोनेरी अक्षरें पाहिलीं व म्हटलें, " British ? you are alright, sir !" तिच्याकडे पाहून त्यानें विचारलें, " British passport, Madam ? "

ती घाबरली होती. तिचा हात थरथरत होता. मीं म्हटलें, "I think, its German. "

त्यानें भिंवया वर केल्या. आंठ्या चढवल्या. पासपोर्टचें पुस्तक उघडून पाहिलें व परत करीत म्हटलें, "मला वाटलंच. माफ करा. या किनाऱ्यावर तुम्हाला पाऊल ठेवतां येणार नाहीं ! "

मी बघतच राहिलों. तिला पासपोर्ट परत घेण्याचेंहि भान राहिलें नाहीं. गांगरून गेलेली. आळीपाळीनें ती आम्हा दोघांकडे बघे. तिला नीटसा अर्थहि कळला नाहीं. शेवटीं जवळच्या परिचारकानें अदबीनें तिच्या कोपराला स्पर्श

केला. व म्हटलें " Please madam, this way. " आणि तिला दारांतून बाजूला केले.

मी अधिकाऱ्याजवळ रदबदली केली. तिचें मूल पुढें गेल्याचें सांगितलें. पण त्याचें उत्तर एकच, " I am sorry sir, German Jews are not allowed on these shores ! " मी तिला परत घेऊन येण्याची हमी घेतली. पण तेंच उत्तर. सभ्य पण निश्चयाचें. " My orders, instructions are strict. I am sorry. "

डेकवरच्च कठड्याशीं एका बाजूला मी उभा राहिलों. तिच्याशीं सुद्धां बोलतां येईना. चिडीनें, आवेशानें, मुख मुकें झालें होतें. पाईप काढला आणि पेटवून बाहेर बघत राहिलों.

डेकवरच्च पलिकडे थोडी गर्दी होती. कांहीं गोरे स्त्रीपुरुष. मध्येंच उंच टोपी घातलेला एक आरब उभा होता. हंसत होता. संभाषणाचे कांहीं भाग मधूनच कानावर येत होते.

कुणीसें विचारलें, " पण आम्ही काय पाप केलं आहे ? नुसतं बंदरावर जाऊन परत येण्याची सुद्धां आम्हांला बंदी ? "

त्या आरबानें उलट विचारलें, " पण परत बोटीवर याल ही हमी कोण घेणार ? "

" म्हणजे जाऊं कुठं ? "

" काय भरंवसा ? तुम्ही निर्वासित आहांत. कुठंहि जाल. कुणाच्याहि घरांत आसरा मिळेल तिथं राहाल. पॅलेस्टाईनमधें गेलांत तर ? "

सगळे स्तब्ध झाले. मध्येंच कुणीसें उत्तेजित स्वरांत म्हटलें, " पॅलेस्टाईन म्हणजे परक्याचें घर नव्हे. ती आम्हां यहुद्यांची भूमि आहे ! "

त्या आरबानें उपहासानें हंसून खांदे उडवले व म्हटलें, "खरंच ? मला माहित नव्हतं ! माझी समजूत आहे, पॅलेस्टाईन आज आम्हां आरबांचंच आहे ! "

कुणाची समजूत खरी कुणी सांगावें? रोमन्स येण्याच्या पूर्वी, मुसलमानांच्या पूर्वी, पॅलेस्टाईन यहुद्यांचें होतें असें इतिहास सांगतो. पण इतिहास बहुरूपी आहे. त्याची साक्ष कोणच्याहि देशांनीं घेऊं नये!

—१९—

हॅर्टी कुठें आहे?

तिच्या चेहऱ्यावर भोगलेल्या दुःखांच्या अनेक साक्षी होत्या. जर्मनींतून बाहेर पडलों. स्वातंत्र्य मिळाले असें तिला वाटलें. तोंच हा आघात. मला काळजी वाटूं लागली. तिचा धीर खचेल. क्वचित् मनाचा तोलहि जाईल. दाबलेल्या विचारांचा स्फोट झाला म्हणजे माणूस आततायी होतें. मी सारखा शोधीत होतों.

सगळे भेटले. चेहेरे म्लान होते. पण एक विचित्र भाव होता. अपेक्षित गोष्ट घडल्याचा. लुईच्या आईला काळजी होती ती फक्त मुलाची. हरमान तर बायकोची थट्टाच करीत होता. मला म्हणाला, "पाहिलंत, कशी नटली होती? इतक्या रात्रीं पोर्ट सैदमधें हिच्याकडे कोण बघणार होतं?" तिनें थोडें चिडून उत्तर दिलें, "मला पत्रं टाकायचीं होतीं बंदरावर" तो म्हणाला, "पत्रांसाठीं बोटीवर पोस्ट आहे!" कायटेल मला पाहून हंसला, म्हणाला, "उगीच झोंपमोड झाली त्याचंच जास्त वाईट वाटतं."

डेकवर मी हॅर्टीला गांठलें. दुरूनच हांक मारली. ती एकदम वळली. जवळ गेल्यावर तिनें माझ्या दंडाला धरलें. चांचपून पाहिलें. वाटतें तें खरें आहे भास नव्हे अशी खात्री करून घेतली. व नुसतें असहायपणें म्हटलें, "बॉब!" आणि तोंड फिरवलें!

ओंठ आवळून धरले होते. हात स्वस्तिकासारखे छातीवर होते. ती ऊर दाबून धरीत होती. थोड्या वेळानें म्हणाली, "कशाला आलास?

कुणीं लक्ष दिलं कीं जाणीव होते आपण माणूस आहों म्हणून. पण पुन्हां तुडवलं जाण्यासाठींच ! "

मीं तिचे हात सोडवले. हातांत घेऊन म्हटलें, " हॅर्टा मला बोलतां येत नाहीं. "

थोडासा प्रकाश होता. तिच्या हातावर रक्ताचे थेंब दिसले. मी चपापून म्हटलें, " काय ग हें ? " तिनेंहि पाहून स्वतःशींच उत्तर दिलें, "मघाशीं दांत लागले वाटतं ! "

हताश क्रोधाच्या आवेशांत तिनें स्वतःच केलेल्या दंशाच्या त्या खुणा होत्या ! त्या दाखवून तिला रागानें मी म्हटलें, " तुला वेड तर नाहीं लागलं हॅर्टा ? "

तिनें रुमाल काढला. रक्त पुसलें आणि मला म्हटलें, " तुला एकच विनंती करायची बॉब. झाल्या प्रकाराबद्दल एक अक्षरहि आपण बोलायचं नाहीं. "

ती स्वतःविषयीं, जर्मनींतल्या आयुष्याविषयीं फारच क्वचित् मजजवळ बोलली होती. मनांत शल्यें सलत होती. पण स्वतःच्या दुःखाचें प्रदर्शन मांडणें तिला लाचारीचें वाटत असावें.

पण खोल रुतलेला कांटा तापल्या तेलाच्या थेंबानें सुटतो. वर येऊं लागतो. माझ्या स्नेहाच्या उबेनें त्या रात्रीं तिच्या मनांतल्या दुःखांना वाचा फुटली.

डेकवरच आम्हीं उभे होतों. मी विचारांत गुंग होतों. तिनें विचारलें, " कसला विचार करतां ? "

मी भानावर आलों अर्धवट. तिला म्हटलें, " हॅर्टा तूं हिटलरला पाहिलें आहेस का ? तुला आवडतो का तो ? "

ती चमकली. पण तिला दिसलें. तिला दुखविण्याचा माझा इरादा नव्हता. माझ्या मनांतल्या गोंधळाची अंधुक कल्पना तिला आली असावी. तिनें

उत्तर दिलें, "होय. मला फार आवडतो हिटलर. भेटला तर मुका घ्यायचा आहे!"

मी पाहिलें. दाबलेला त्वेष, नजरेंत द्वेषाचा विखार, स्वतःच्या असहाय-तेची चीड! त्या स्वरांत या सगळ्या विकारांची धार होती. माझ्या मनांत कल्पना आली, चुंबनाची संधि मिळाली तर सूडाच्या संतोषासाठीं ही सुंदर तरुणी विषकन्या व्हायलासुद्धां मागेंपुढें पहाणार नाहीं!

एका बोटांत अंगठी होती. सोनें खास नव्हतें तें. पण प्लॅटिनमहि नव्हतेंच. कसल्या तरी हिऱ्याची अंगठी ती घालील असेंहि वाटेना. मीं हात उलटून पाहिला.

तिनें विचारलें, "काय पहातोस?" मी म्हटलें, "विचारणार होतों, पण खाजगी गोष्टी विचारूं नयेत असा शिष्टाचार आहे."

तिनें उत्तर दिलें, "तुझं आणि माझं नातं नुसतं शिष्टाचारापुरतं आहे खरंच!

मीं म्हटलें, "या अंगठीविषयीं विचार करीत होतों."

तिनें हात सोडवून घेतला. अंगठीकडे बघितलें. थोडी चाळवली आणि म्हटलें, "तूं विचारलं नाहींस पण मी सांगतें. ही अंगठी कुणी दिली आहे ठाऊक?"

मीं मान हलवली व म्हटलें, "कळण्याची उत्सुकता पण नाहीं."

ती हंसून म्हणाली, "Thanks. तूं खरंच सद्‌गृहस्थ आहेस. पण तुला नको असलं तरी बोलून मला बरं वाटेल. तूं ऐकशील का?"

मीं पुन्हां हात हातांत घेतला व म्हटलें, 'सांग.'

## —२०—

अंगठी काढून तिनें हातांत घेतली व समोर धरली. वरची मुद्रा दाखवीत म्हणाली, "हीं बघ अक्षरं. K. आणि F. कार्ले फ्रांझ या नांवाचीं. तूं रागावणार नाहींस ना? रागाऊं नको बॉब. आज मी तुझी प्रिया आहें. जर्मनी सोडतांना

हा माझा प्रियकर होता. वेश्या असलों तरी आम्ही बायका प्रेमाचं माप मोजून जोखून घालतों.

"कार्लेची मी निवड केली. आम्ही शपथबद्ध झालों. त्याची खूण ही अंगठी. मिळाली तेव्हां प्लॅटिनमची होती. पण जर्मनीतून आम्हाला सोनंसुद्धां बाहेर नेतां येत नाहीं. मी हद्दपार झालें. पैसा, दागिने, ही अंगठी, सगळं हिरावलं गेलं. त्या दरोड्याची खूण म्हणून त्याच नक्षीची ही साध्या धातूची अंगठी मला मिळाली. तीच घालतें."

अभावितपणें मी दूर झालों. माझें तिच्यावर प्रेम नव्हतें ना? मग फ्रांझच्या नांवानें मन असें एकाएकी दुरावलें कां?

तिलाहि तें कळलें असावें! तिनें जवळ येण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. नुसतें म्हटलें, "ऐकणार होतास म्हणून सांगितलें. मला मोकळं बोलायला कुणी नाहीं! मन जीवंत आहे. त्याला तहान लागते, भूक लागते. उपासमार कशी, किती सोसायची? नवे अनुभव येतात. मनाला हादरा बसतो. एखाद वेळीं वाटतं, आपल्या हातून काय होतं आहे हे? फ्रांझ माझं सर्वस्व एकदां होता. त्याची आठवण अजून आहे. पण आज सर्वस्वीं तुझी आहें असं म्हणतें. याला कांही अर्थ आहे का?"

हा ओळखीच्या शब्दांचा पडसाद! उमेच्या पत्रांत हिंदुस्थानांत एकदां उमटला होता! आज इतक्या वर्षांनी, दुसऱ्या खंडांत, दुसऱ्या स्त्रीच्या मुखानें तेच शब्द कल्पनेच्या पडद्यावर आपटले. पुन्हा गर्जना करून उठले! पहिल्या प्रीतीची गळचेपी करणाऱ्या स्त्रीमनाविषयीं आयुष्यांत प्रथमच सहानुभूति उत्पन्न झाली. मी पाहिलें, ती कठड्यावर वांकून खालीं पाण्यांत बघत होती. मी तिला जवळ घेतलें.

नंतर आम्ही दोऱ्यांचे ढीग पडले होते त्यावर जाऊन बसलों. तिला सिगरेट दिली. मी पाईप पेटवला. तिचें मन भरून आलें होतें. आपली हकीकत सांगायला तिनें सुरुवात केली, तीच माझ्या शब्दांत मी तुम्हांला सांगतों.

## —२१—

ऑगस्ट महिना उजाडला. सगळीकडे उनें पिऊन शेतें, कुरणें, तरारलीं होती. त्यावर कापणीच्या विळ्याकोयत्यांच्या उड्या पडूं लागल्या. हंगाम संपला कीं महायुद्ध सुरू होणार अशा वार्ता सुरू होत्या. जर्मनांचे सर्वाधिकारी शस्त्रे परजून ठेवीत होते. मृत्यु आपल्या कापणीची वाट बघत होता !

मिलान एक्सप्रेस सुटायची वेळ झाली. स्टेशनावर फारशी गडबड नव्हती. प्रवासी येत. मुकाट्यानें गाडीत चढत. प्लॅटफॉर्मवर गर्दी नव्हती. फेरीवाल्यांचा ओरडा नव्हता. रेल्वेचे अधिकारी, पोलीस अधिकारी, साध्या वेषांतले गुप्त पोलीस, सगळे नेहमींसारखे हजर होते. स्वित्झर्लंड, इटलीमध्यें सुट्टी साजरी करायला निघालेल्या गुलहौशी प्रवाशांची गाडींत भरती होती. सगळे पुनः जर्मनींत परत येणार होते. नव्हते येणार ते १५–२० मुशाफर. ते आज हद्दपार होत होते. सगळे जर्मन यहुदी होते. बहात्तर वर्षांची हॅर्टाची आई. तिचा पाय कष्टानेंच उचलत होता. हॅर्टा तिला घेऊन डब्यांत चढली. वारंवार ती आईचे मुके घेई, आणि " मुटी, मुटी " एवढेंच म्हणे. डब्यांत आधींच थोडी गर्दी होती. हॅर्टानें त्यांतल्या त्यांत एक बरीशी जागा पाहिली. थर्ड क्लासचा डबा होता. पण बसतांना त्याच्या गादीकडे बघून आईनें म्हटलें,

" हा आपल्यासाठीं नसेल. " हॅर्टीनें तिला बसवले आणि सामानाच्या व्यवस्थेसाठीं ती बाहेर प्लॅटफॉर्मवर आली.

पण सामानापेक्षांहि तिची नजर तिच्या प्रियकराला शोधीत होती. तो दिसला नाही. फ्रान्झ जर्मन होता. हॅर्टी यहुदी होती. फ्रान्झनें तिला पोचवायला यायचें, तिच्याशीं संबंध आहे असें जाहीर रीतीनें दाखवायचे म्हणजे तें शिक्षेलाच आमंत्रण होतें. पण तिला आशा वाटत होती. इतक्यांत एका पोर्टरने तिला एक चिठ्ठी आणून दिली, आणि हलक्या आवाजांत सांगितले, ' हेर फ्रांझकडून.' तिनें तें पत्र ब्लाउझमध्यें लपविले. तिची नजर कावरी बावरी झाली. संशय येऊं नये, म्हणून ती पुनः डब्याकडे वळली. डब्याच्या दाराशीच तिला एका अधिकाऱ्याने गांठलें. त्याची मुद्रा निर्विकार होती. आवाज करडा होता.

" फ्राउलाईन "

" काय ? "

" तुमच्या सामानाची झडती पुरी व्हायची आहे. सामान तुम्हाला परवां नेपल्सला बोटीवर मिळेल. "

" पण माझ्याजवळ अंगावरच्या कपड्यांशिवाय दुसरं कांही नाही. आईचीं सगळीं औषधंहि त्यांतच आहेत. "

" त्याला इलाज नाहीं. सामान परवां नेपल्सला मिळेल. "

तो बघतच होता. त्याच्या नजरेला नजर देण्याचें धैर्य तिला होत नव्हते. " आणि फ्राउलाईन, " तो पुढें म्हणाला, " आज रात्रीं जर्मन सरहद्द ओलांडतांना तुमची स्वतःची झडती घेतली जाईल. पैसे, सोनं, दागिने, कांहींहि तुम्हांला जर्मनीच्या बाहेर नेतां येणार नाहीं. कांही असलं तर अगोदर सांगा. "

उत्तराच्या अपेक्षेनें तो थांबला. ती कांहीं बोलली नाहीं. तो वळला इतक्यांत साध्या पोषाखांतला एक इसम त्याच्याजवळ आला व त्यानें नाझी सलामी दिली व म्हटलें, " पांच मिनिटांपूर्वी फ्राउलाईनला एक पत्र मिळालं आहे तें आम्हांला पाहिजे आहे. "

हॅर्टोचा हात अभावितपणें हृदयाकडे गेला. तिला शब्द फुटेना. नजर दिशाहीन झाली. त्या अधिकाऱ्यानें पुनः म्हटलें, " तुम्हाला त्रास द्यावा अशी इच्छा नाही. पण तें पत्र तुम्हीं द्यावं हें बरं ! " ती कांहीं बोलली नाहीं. तो पुढें म्हणाला, " मुकाट्यानें ते आमच्या हवालीं केलं नाहींत तर तुम्हांला अडकून पडावं लागेल. तुमची म्हातारी आई एकटीच शांघायपर्यंत जाईल–तोंपर्यंत जगली तर ! " तिनें मुकाट्यानें तें पत्र काढून त्यांना दिलें. देतांना एवढेच म्हटलें, " मला तें एकदां वाचूं तरी द्या." त्याचें उत्तर न देतां तें खसकन् घेतलें. दोघेहि वळले आणि निघून गेले.

गाडीला पांच मिनिटें राहिलीं. दोन तीन हिंदी विद्यार्थी लगबगीनें येऊन गाडींत चढले. त्यांचें बरेंचसें सामान चढवलें गेलें. थोड्याशा हेव्यानें हॅर्टो त्या सामानाकडे बघत होती. हातगाडीवरचें सामान संपल्याबरोबर हॅर्टो एकदम चपापली. गार्डाच्या पलीकडेच वर्तमानपत्रें–पुस्तकांच्या दुकानाची लहानशी हातगाडी उभी होती. तिथें कार्ले फ्रांझ उभा होता. तो पुस्तकें चाळण्याचें मिष करीत होता. पण त्याची नजर तिला शोधीत होती.

त्याला पाहतांच हॅर्टो लगबगीनें त्याच्याकडे निघाली. पण त्यानें तोंड फिरविलें. ती थांबली. ओळख देणें धोक्याचें असें त्याला वाटत असावें. तिने थोडा विचार केला. नंतर निर्धारानें ती पुढे गेली. तिनें त्याला हांक मारली, " कार्ले ! " त्यानें आश्चर्यानें तिच्याकडे पाहिले. कष्टानें पुढें बोलत ती म्हणाली, " कार्ले, आतां कांही इलाज नाही. तुझें पत्र जेस्टा-पोच्या–गुप्त पोलिसांच्या हातांत गेलें आहे ! "

त्याचा चेहरा फटफटित झाला. शब्दच फुटेनात. दोघेहि एकमेकांकडे बघत उभीं राहिलीं. अखेरच्या भेटीचे ते अमोल क्षणहि या वेडेपणांत हरपले. गाडी सुटली. निरोप न घेतांच हॅर्टोला गाडीत चढावें लागलें !

# —२२—

स्वप्नांत सगळें दिसतें. पण स्वतःचा चेहरा दिसत नाहीं. आठवणींचें असेंच असतें. हॅर्टोला सगळें आठवे. पण कार्लचा चेहरा नजरेसमोर येईना. त्याचे निळेभोर डोळे मध्येंच आठवत. लहान कापलेले ताठर केस दिसत. लष्करी पोषाखाची ऐट मध्येंच दृष्टीसमोर येई. पण त्याचा चेहरा; तो कांहीं केल्या समोर येऊं नये !

गाडी धांवत होती. हॅर्टी तिथेंच उभी होती. त्या पत्रांत काय असेल ? वेडेपणानें त्यानें भलतेंच लिहिलें असेल का ? यहुद्यांशीं जर्मनांनीं संबंध ठेवायचा नाहीं असा जाहीरनामा निघाला, तेव्हांपासून फ्रांझ तिला टाळीत असे. त्याचा ओढा कमी झाला नव्हता. त्या हुकुमानें दीडच वर्षांच्या त्यांच्या गोजिरवाण्या प्रेमाच्या गळ्याला नख लावलें ! त्या पत्रामुळें कार्लला शिक्षा होईल का ? समजा, त्यानें लिहिले असलें, ' वाटेल तें झालं तरी तुला सोडणार नाहीं. जर्मनी सोडीन पण तुझ्याशीच लग्न करीन ! ' तर ? तर काय ? तुरुंग ? किंवा—तिच्या अंगावर शहारे आले. इतरांच्या गोष्टी तिनें ऐकल्या होत्या. जेस्टापोचे अधिकारी त्याचा खूनसुद्धां करवतील का ?

कल्पना इतकी साहजिक, इतकी खरी होती कीं ती घाबरली. तिनें तोंडाशीं हात नेला, बाहेर येणारी किंकाळी गुदमरून टाकावी म्हणून. हात गार होता त्याहिपेक्षां गार तिच्या बोटांतली आंगठी ओठांना लागली. तिनें पाहिलें. त्यांच्या लग्नशपथेची ती आंगठी. त्यावर कार्ल फ्रांझच्या नांवाची मुद्रा होती. मिळाली तेव्हां सोन्याचीहि नव्हे प्लॅटिनमची. पण जर्मन सरकारनें तें प्लॅटिनम हिरावून घेतलें. कसल्या तरी टिनाची आंगठी मोबदल्यांत तिला दिली. देणारा अधिकारी कुचेष्टेनें तिला म्हणाला, " फ्राउलाइन, जर्मनीला सगळ्या धातूंची आज गरज आहे शस्त्रांसाठीं. हीन असली तरी धातु आहे. पण जर्मन सरकार तुमच्यासाठीं हा स्वार्थत्याग करतं आहे ! "

कार्लेच्या सहवासांतच तिच्या पहिल्या प्रीतीचा जन्म झाला. किती चोरटी, किती नाजूक ती प्रीति! हॅर्टाची स्वतःची सुद्धां तिला दृष्ट लागे. साल्झबर्गच्या रानांत रविवारच्या सहलीला तीं गेलीं होतीं. अंधार पडायला लागला. हिंवाळ्याचे दिवस. हवेंत मिश्र सुवासांचा उन्माद भरला होता. वाट चुकून दोघेंहि भटकलीं. थकलीं. कांहीं केल्या रस्ता सांपडेना. शेवटीं एका ओढ्याच्या कांठीं दोघांनीं फराळाचें काढलें. केळ्याच्या साली सोलून हॅर्टानें खालीं टाकल्या. तो म्हणाला, " फ्राउलाइन, जर्मनी माझा आवडता देश आहे. त्याची भूमि अशी विद्रूप केलेली मला आवडत नाही!" तिनें एवढेंच म्हटलें, " माझे बाबा मागच्या महायुद्धांत जर्मनीसाठीं लढतांनाच मारले गेले आहेत!" कार्लेनें तिचा हात धरला व म्हटलें, " माफ करा, तुम्ही यहुदी आहांत हें ठाऊक होतं, पण जर्मनच आहांत हें आतां कळलं."

फराळ झाल्यावर दोघेंहि पुनः निघालीं. नव्या जर्मनीच्या यशाची राइखवेरच्या गौरवांची गाणीं गात पुन्हां त्यांनीं रानें तुडविलीं. हातांत हात होते. बरोबर पावलें पडत. रात्र झाली. रस्ता सांपडेना. गवतांतून कांही-तरी सरपटल्याचा आवाज झाला. ती घाबरून फ्रांझला बिलगली.

त्यानें तिला जवळ घेतलें आणि तिचा मुका घेतला. पाहतां पाहतां तिचे डोळे पाण्याने डबडबले. तिच्या कातर मनाला त्याच्या मिठीचें रक्षण अभेद्य कवचासारखें वाटलें. त्याच्या ओठांच्या स्पर्शाने तिच्या मनांतली सगळी भीति शोषून निघाली. त्या क्षणांत तिने स्वतःचे अर्पण फ्रांझच्या ओंजळींत करून टाकून, मुक्तीचा अनुभव मिळविला!

स्त्रीची प्रीति एकदांच उपजते, एकदांच मरते. तिची निष्ठा एकांतिक अढळ असते. अशीच तिची श्रद्धा होती. हा पाश निर्माण झाला, तेव्हां तिला आभाळ ठेंगणें झालें. सगळें विस्तीर्ण जग अंगणांत सामावल्यासारखें झालें. पण अर्ध्या घटकेपूर्वी गाडीची शिटी झाली, तिच्या कर्कशपणानें सगळे पाश करवतून गेले. धमनी तुटली म्हणजे सुरू झालेला रक्तस्राव जीव घेऊनच थांबतो. हॅर्टाची संवेदना बधिर झाली.

## —२३—

अंधार पडूं लागला, जेवण्याची वेळ होत आली. परिचारक सगळ्या डब्यांतून जेवण तयार आहे, म्हणून सांगत गेला. शेवटच्या डब्याशीं तो आला. तिथल्या संडासाशीं दुसरा परिचारक उभा होता. त्यानें मान हलवून म्हटले, " पुढं कशाला जातोस ? सगळे भुकेबंगाल यहुदी आहेत. उपाशी राहतील, पण पैसे खर्च करणार नाहींत ! "

कायटेल बोळकंडीच्या रस्त्यांत उभा होता. त्यानें तें ऐकलें. आणि तो परत आपल्या जागेकडे वळला. सुमारें पन्नाशीचें वय टक्कल पडलेलें. अस्सल जर्मन बीरनें पोसून स्थूल बनविलेलें शरीर. यहुद्यांचें शिरकाण जर्मनीत सुरू झालें तोंवर त्याचे सगळे दिवस बरेचसे सुखांत गेले होते. आतां नोकरीहि सुटली होती. सांठविलेली पुंजी सरकारजमा झाली होती. अर्धी उमर उलटल्यावर नव्या जगांत नवा जन्म घेण्याची पाळी त्याला आली होती.

पण त्याचा स्वभाव धिमा होता. परिस्थितीपुढें वांकायचे आणि जगत जायचें एवढें त्याला साधलें होतें. पुढच्या आयुष्याविषयीं आधींच त्याचे विचार सुरू झाले होते.

तो डब्याकडे गेला. त्यानें दार सारलें. त्याच्या डब्यांत दोघेंच होतीं. हरमान आणि त्याची बायको. फ्राउ हरमान नवऱ्याच्या मिठींत विसावली होती. नवरा तिला ब्रेडचे घांस देत होता.

कायटेल आल्याचें पाहूनहि ती दूर सरलीं नाहींत. गेलीं दोन वर्षे सगळ्या यहुद्यांना आयुष्यांत मुळींच खाजगीपणा नसल्याची संवय झाली होती. कुठेंहि गेलें तरी पहारा, संशयित नजरा, हेरांच्या टेहळण्या. नवराबायकोच्या भेटीसुद्धां मुष्किलीनें व्हायच्या. होतील कशा ? घरें गेलेलीं. हॉटेलें, उपहार-गृहें, थिएटरें बंद झालेलीं. मोकळे असतील ते फक्त रस्ते आणि बागा. त्यांतहि तऱ्हतऱ्हेचे अटकाव असतच.

कायटेल मात्र तसाच परत फिरला. दुसऱ्याच डब्यांत हॅर्टीची आई एकटीच बसली होती. डोक्यावर विरळ पांढरे केस. ती, तिच्या जळून विझत आलेल्या भावना विकारांच्या निखाऱ्यांची राखच. डोळ्यांत चिपडें माजलेलीं. अश्रू गाळण्याइतका ताजेपणाहि त्यांत नव्हता. घाईनें कातरलेल्या चामड्याच्या तुकड्यासारखे ओंठ पुढें येऊन लोंबत होते.

कायटेल आल्याबरोबर तिला वाटलें, हॅर्टी आली, तिनें मान वळविली आणि कायटेल दिसल्याबरोबर निराशेने पुनः मान फिरवली. तिला बर्लिन सोडण्याचें सुखदुःख नसावे. आपलें थडगें कुठल्या भूमींत असावें, एवढ्याबद्दल का माणसाचा अट्टाहास राहणार आहे?

कायटेल खालीं बसला. त्यानें म्हातारीकडे पाहिलें. ती थरथर कांपत होती. हवेंत गारठा आला होता. त्यानें उठून दारें लावलीं. खिडक्यांच्या कांचा सारल्या आणि डोक्यावरच डब्यांत ऊब सोडणारी पितळेची मूठ होती, ती फिरविण्यासाठीं हात वर नेला.

तिनें दचकून त्याच्याकडे पाहिलें, आणि म्हटलें, "नको, नको. कदाचित् आपल्याला त्याची परवानगी नसेल! ऊब जर्मनासाठींच असायची!"

तो पुनः खाली बसला. त्यानें म्हातारीला खाण्याचें विचारलें. तिनें संमति दिली. तेव्हां आपल्या डब्यांतून त्यानें फराळाचें सामान आणलें. कांही फळे, भाकरीचे तुकडे, थोडीशी अंडी आणि सँडविचेस् तो देत होता आणि म्हातारी खात होती. दोघांनीं बेसुमार खाल्लें.

एखादे वेळीं नाहीं नाही त्या बातम्या उठत. त्यांत तथ्य असेच असें नाहीं. यहुद्यांना सार्वजनिक स्थळें बंद झालींच होतीं. त्यांत आदल्या आठवड्यांत बातमी उठली, सार्वजनिक संडास आणि मुत्र्यांचा उपयोग यहुद्यांना मना झाला आहे! या बातमीनें यहुदी स्त्रिया क्वचित्च बाहेर पडत.

रात्रीं अकराबारांचा सुमार असेल. मार्थाला विव्हळणें ऐकूं आलें. तिनें आपल्या आईला उठवलें. गाडीची धडधड चालूच होती. मार्थाची आई

हॅर्टीच्या डब्याकडे गेली, मार्थाला तिनें कायटेलला बोलावून आणायला सांगितलें.

थोड्या वेळानें मार्थाची आई परत आली. तिला किळस आल्याचे शहारे येत होते. कायटेलला पहातांच ती म्हणाली, " या तरुण कार्ट्यांचा विश्वास नाहीं कांहींच. हॅर्टी कुठं चाळे करायला गेली आहे कुणास ठाऊक ! तिकडे सगळी म्हातारीची विटंबना झाली आहे ! "

रात्री अकराच्या सुमाराला हॅर्टीची आई जागी झाली. तिच्या पोटांत दुखायला लागलें. छातीवर दडपण होतें. डब्यांत एकटी उठायची, बाहेर जायची सुद्धां चोरी वाटे. भीति वाटे. नाइलाज झाला, तेव्हां ती उठली. दार उघडून बोळकंडींत गेली. डब्याच्या टोकाशीं स्नानगृह आणि संडास होते. अंधुक प्रकाश पडला होता. त्यांतच संडासाच्याच बाजूला पेंगत असलेल्या परिचारिकेचा गणवेष तिला दिसला. तिला भीति वाटली. नाइलाज होता तरी ती परत फिरली. पोटांत कळा उठूं लागल्या. ती विव्हळूं लागली. तेंच शेजारच्या डब्यांत मार्थानें ऐकलें. मार्थाला ती हकीकत ऐकून मनस्वी हसूं आलें. कायटेल चिडून म्हणाला, " हंसतेस काय ? समोरचे दांत सोन्याचे आहेत. तेंहि सोनं काढून घेतील तेव्हां समजेल. "

आईच्या असहाय शरीराची ती किळसवाणी विटंबना पाहून हॅर्टीला मरण बरें असें झाले. आज निर्वासनाचा पहिला दिवस. अजून जर्मन सरहद्द ओलांडायचीच आहे ! उरलेलें आयुष्य अनोळखी जगांत आधाराशिवाय काढावयाचें. त्यापेक्षां आजच शेवट केला तर ! पण आत्मघात असा सोपा असतो का ? असता तर यापूर्वींच तिनें मोक्ष मिळवला असता. निराशेच्या त्वेषाचा अतिरेक होऊन तिनें एकदां दोनदां मृत्युद्वाराच्या उंबरठ्याकडे धांव घेतली होती. पण ती द्वारें उघडली नाहींत. अगदीं थोड्या दिवसांच्या आधींची गोष्ट. तिला सगळें आठवूं लागलें.

—२४—

आपल्या घराला आग लागली. उपनगरांत एका सुरेखशा आडरस्त्याला तिचें घर होतें. आग लागली ती तिच्या घराला नव्हे. सगळी वस्तीच यहुद्यांची होती. एकदम तीन चार आगी लागल्या. पण त्या अनपेक्षित नव्हत्या. दगड येत. खिडक्या फुटायच्या. दारांच्या चिरफळ्या व्हायच्या. बाहेर पडतांना दार उघडायची भीति वाटे. बाहेरून परत यावें. दार उघडतांना तिचे ऊर धडधडे. वाटे, कसला प्रकार दृष्टीस पडेल कुणास ठाऊक. आग लागली तेव्हां ती घरांत एकटीच होती. घाबरून बाहेर आली. तीहि मागच्या दारानें. रस्त्याच्या कडेच्या एका झाडाखाली अंधारांत उभी राहिली. लोक जमले होते. कांहीं भयचकित झालेले. कांहीं नुसतेच बघत तर कांहीं हंसतखिदळत. विझवण्याचा प्रयत्न कुणी केला नाहीं. Fire-brigadeला वार्ता पोंचली असेल. पण कुणी आलें नाही. यहुद्यांना मदत करणे म्हणजे शिक्षेला आमंत्रण ! ज्वाळा धडाडत होत्या. घर कोसळत होतें. डोळ्यासमोर जळलें. बेचिराख झालें. बाहेर फाटकावर पाटी होती, " यहुद्याचें घर." फाटक शिल्लक राहिलें. पाटीवर नंतर कोणी खडूनें लिहिलें, " पूर्वीं येथें होतें. "

तिच्या मनांत डोंब उसळला. पण त्या जळण्यानें स्वतःच जळायचें. पुष्कळ दिवस दुरूनच ती ऐकत होती. आज कळस झाला. अनेक तऱ्हेचे छळ, अपमान. नुसती वर्णनें ऐकत असे. पुढें प्रत्ययाला येऊं लागलीं. कुठेंहि जावें. लोक टवकारून बघत, बोटें दाखवीत. नोकऱ्या असल्या तर त्या सुटायच्या. बेकारी यायची. राह्यला घर भाड्यानें मिळायचें नाही. खायचें असलें तर हॉटेलांतून मज्जाव. करमणुकीला कुठेंहि गेलें तर बाहेर " यहुद्यांना बंदी " अशा पाट्या. तिची नोकरी बऱ्याच उशिरां, पण सुटलीच. मालक जर्मन होता. बिचारा फार फार सज्जन होता. निरोप देतांना त्यानें सांगितलें, " फ्राउलाइन, जर्मनी सोडण्याची पाळी येईल, त्या दिवशीं

माझ्याकडे ये. पैसे दिले असते, पण तुला बाहेर नेतां येणार नाही. केल्या कामाचं उत्तम सर्टिफिकेट मात्र देईन. जर्मनींत कुणालाहि दाखवूं नको. दाखवलंस तर मला फळ भोगावं लागेल."

नोकरी गेली. कसेतरी दिवस जात होते. ती एकटी, पण फ्रांझचा आधार वाटे. नुसतें भेटणें बोलणें एवढ्यानेंच धीर येई. तो म्हणे, 'हॅर्टा, भिऊं नको. ही क्षणिक वेडाची लाट आहे. ओसरेल. पुनः सगळं निवळेल.'

आग लागली त्याच दिवशीं यहुद्यांना जर्मनाशीं शरीरसंबंध ठेवण्याची बंदी करणारा कायदा प्रसिद्ध झाला. तिच्या आशेचा विध्वंस झाला. फ्रांझचा आधार अखेरचा, तोहि तुटला. मनमुराद रडावेंसें वाटे. घर होतें तेव्हां दृष्टिआड रडायला जागा होती. तेंहि जळून गेलें. रडायची चोरी झाली.

ती हतबल झाली होती. पण उठली! कुठें जावें? कळेना. रस्ते शांत झाले होते. लढाईची तयारी म्हणून रस्त्यावरचे दिवे निळे होते. त्यांच्या रांगा लुकलुकत होत्या. ती उठली आणि चालूं लागली. किती वेळ चालली कुणास कळे. थकवा आला होता. मन विव्हल झालें होते. विचारांनीं ग्लानि आली. सगळें शांत. किती भयाण शांतता! हिंवाळ्याचे दिवस. झाडांच्या सावल्या फूटपाथवर पडत. दगडावरची धूळ ओलसर हवेनें दबली होती. प्रकाशांतली धूळ आणि दगडांचा शुभ्रपणा उठून दिसे. चालतां चालतां तिला वाटलें, हा गालिचा पसरला आहे!

तीच तिच्या त्या वेडसरपणाची सुरुवात. ती भानावर आली. मनाशीं तिनें म्हटलें, "काय वेडेपणा? रस्ता सुंदर दिसतो. पण हा गालिचा नव्हे." खरें काय आणि खोटें कोणतें यांच्या इंद्रियांना भासणाऱ्या द्वंद्वाला त्याच वेळीं सुरुवात झाली. एखाद्या वेळीं मोटर येई. तिच्या दिव्यांच्या प्रतिबिंबाच्या रेषा ॲस्फाल्टच्या रस्त्यांत पडत. त्या सुरीसारख्या भासत. मध्येंच तिला वाटे, त्या सुऱ्या अंगावर येत आहेत! पण जवळून गाडी गेली कीं सुंदर खेळण्यासारखी दिसे.

झाडें भुतासारखीं उभीं दिसत. घरांच्या खिडक्या प्रकाशलेल्या. पण जसजसे दिवे मालवत तसतसें वाटे, आपण आलों म्हणूनच हा अंधार. एक मन म्हणे, वेडी तर नाहींस ? हें दिसतें तसें नाहीं. दुसरें लागलीच जागें होई, दिसतें तसेंच आहे.

पोटांत अन्नाचा लेश नव्हता. डोळ्यांत जीव गोळा झालेला. जर्मनांशीं संबंध नाहीं ? मग काले जर्मन आहे ! पण तो आतां आपल्याला हरपला काय ? त्याच्या मिठीचें रक्षण अभेद्य वाटे. त्यालासुद्धां तडा पडला. त्याला धमकीचीं पत्रें येत. माझ्यामुळें त्याच्या जिवाला धोका.

त्या विचारांनीं पिच्छा पुरवला. मनाला सगळ्यांत खरें वाटणारें, आधार देणारें प्रेमाचें सामर्थ्य, तेंहि विरलें. मग खरें असें काय उरलें आहे ? घरें चित्रासारखीं वाटूं लागलीं. रस्ते नुसते काळ्या निळ्या रंगांच्या पट्ट्यासारखे वाटूं लागले. निळ्या प्रकाशांत बागांची मेंदी दिसे, त्यावरचें दंव चमके. वाटे, हें आतां उडून जाईल. स्वतःच्याच बुटांच्या टापा ऐकून मध्येंच ती मागें वळून बघे. कधीं कुणी असे, कधीं नसे ! पण कोणीहि बोललें नाहीं. तिच्या अस्तित्वाची दखल घेतली नाहीं. एकाएकीं तिच्या मनांत विचार आला, आपलें अस्तित्व गळून तर गेलें नाहीं ? आपण अदृश्यपणें तर फिरत नाहीं ?

छे, हेंच बर्लिन. आपल्याकडे कुणी बघत नाहीं असें होईल कसें ? वाईट चालीच्या मुली भेटत. त्यांना एखादा हटके. तिला वाटे, निदान यानें तरी विचारावें, येतेस का ? कळेल मी जीवंत आहें. हो म्हणेन आणि माझा आवाज तरी ऐकूं येईल. पण कुणी पाहिलें नाहीं. बाग लागली. सुंदर फुलांचे ताटवे होते. अर्धेच प्रकाशांत चमकत. ती बघत उभी राहिली. नेहमींची संवय. बांकावर बसून विश्रांति घेण्याची ज्यूंना बंदी आहे ! एकदम विचार आला. बांकावर बसूं. जींवंत असलों, हें सगळें खरें असलें तर कुणी तरी हटकील. ज्यू म्हणून उठवून लावील. कुणी बघितलें नाहीं. उठवलें नाहीं.

गार वारा झोंबत होता. तरी मन वेड पांघरीत होतेंच. वाटलें, सगळीकडे मला बंदी. खायचें नाहीं, बघायचें नाहीं. जगायचेंसुद्धां का नाहीं? मग हा वारा मोकळेपणीं अंगावर कसा येतो? मी ज्यू आहें हें याला कळत का नाहीं?

ती पुन्हा चालूं लागली. आतां तिची खात्रीच पटली. मोटरी जवळून जात त्यांची भीति वाटेना. जाणारें माणूस पुरुष कीं स्त्री तिच्या ध्यानांत येईना. खात्री पटली, हें सगळं आपल्या आयुष्यांतलें नव्हेच. आपलं जग निराळेंच. या बर्लिनमध्यें आपल्याकडे कुणी बघतसुद्धां नाहीं हें खरें कसें होईल? याच रस्त्यांतून मी फिरलें होतें! मागच्या युद्धांत आमचा पराभव झाला. भर रस्त्यांत आम्ही सगळे जर्मन मिठ्या मारून रडलों. बाबा लढाईवर गेले. आईचें बोट धरून मी चालायची. ओळखीचीं माणसें बोटें दाखवीत. आई अभिमानानें चालायची. माझ्या मैत्रिणींना मी सांगे, माझे बाबा लढताहेत जर्मनीसाठीं. बाबा मारले गेले. आम्ही बसमधून जात होतों. आईच्या दुकानांतली जर्मन मैत्रीण होती. तरुण होती. आईला तिनें बघितलें आणि तिनें मिठी मारली. दोन्ही गालांचा मुका घेतला आणि म्हटलें, "मुटी, मुटी मी आतां पोरकी झालें!" तें खरें कां हें खरें! तींच बोटें, त्याच नजरा – बिचारी सत्तर वर्षांची म्हातारी माझी आई. भर रस्त्यांत फूटपाथवरचें बर्फ गुडघे टेंकून पुसून काढते आहे! छे, हें खोटें. ऐन हिंवाळा. बर्फाचा कहर. खरें असतें तर मेली नसती का? निदान संधिवात नसता का झाला? छे तावदानावर दगडाचे आवाज होतात. तारा तुटून घरांतले दिवे जातात. बिछान्यावर फुटक्या खिडक्यांतून घाण येऊन पडते, सगळें सगळें खोटें. तेंच जुनें जग खरें. आम्हीं ज्यू नाहीं, आम्हीं जर्मन आहों.

पण जुनें जग? म्हणजे पुष्कळ वर्षें झाली. मग मी जीवंत नाहीं का? मग या आंत वळलेल्या दृष्टीला प्रकाश कसला बोंचतो? एखाद्या वेळीं भिंतीचा धक्का लागतो तेव्हां वेदना होते ती खरी कां खोटी? खोटें सगळें तें. जें थोडें खरें असेल त्याचाहि भासच. घर गेलें, कार्ल गेला, जर्मन नागरिकत्व होतें तेंहि गेलें.

त्या द्वंद्वाचा शीण तिला आला. वाटलें, या दिव्याभोंवतालच्या पतंगाएवढें शरीर, पण त्याचे भोग किती अपार ! त्यापेक्षां हें खोटें जगच डोळ्यासमोरून नाहींसें केलें तर ? होय ही आत्महत्यासुद्धां नव्हे. खून, आत्महत्त्या हीं केवढीं मोठीं नांवें ? माणसाला मारलें तर खून होतो. घुंघुरटें चिरडलें तर त्याची दखल तरी घेतो कां आपण ?

समोरच ट्युबचें स्टेशन होतें. आत्मघाताला ट्यूबचा अंधार बरा, म्हणून ती स्टेशनांत शिरली. कशी चुकली कुणास कळे. पहांट होत आली होती. ती स्नानगृहांत शिरली. समोर मोठा आरसा होता. त्या आरशांत तिनें स्वतःला पाहिलें. तिचा विश्वास बसेना. इतकें ४–४॥ फुटांचें शरीर. सर्वस्वीं आपलें ! केवढी मोठी संपत्ति वाटली ती तिला ! तिला स्वतःच्या अस्तित्वाची जाणीव झाली. हात, पाय, धड, मस्तक सगळें मोठें होऊन डोळ्यांत शिरायला बघूं लागलें. याचा नाश करायचा ? किती कठिण तें ? किती वेडेपणाचें ?

बराच वेळ ती स्वतःकडे बघत होती. शेवटीं नळाजवळ गेली. डोकें पाण्यानें भिजवलें. भानावर आली. केवळ त्या वाट चुकण्यानेंच त्या दिवशी ती वांचली होती.

*

## —२५—

न्याहारी घेऊन मी वर आलों. रस्त्यांतच मन्नान भेटला. तो हॅटोला कसला तरी निरोप सांगत होता. तिनें प्रथम न ऐकल्यासारखें केलें. शेवटीं म्हटलें, "तुमचे आभार मानतें. पण मला तिथं जायचं नाहीं. माझ्या मनाला भीक घेण्याची संवय नाहीं."

कायटेल हंसत होता. मी त्याला हंसण्याचें कारण विचारलें. त्यानें उत्तर दिलें, "आम्हां यहुद्यांना सगळं साधतं. साधत नाहीं फक्त धर्मादाय करणं!"

पोर्ट सैदला यहुदी निर्वासितांना मदत करणारी एक ज्यू कमिटी होती. आदल्या रात्रीं तिनें मदत म्हणून कांहीं कपड्यांचीं गाठोडीं आणि पैसे पाठविले होते. सहानुभूतीचा संदेशहि पाठविला होता. डेकवर यहुदी जमले होते. एकानें संदेश वाचून दाखविला. कपड्यांची गांठोडीं सोडलीं. त्यांत बहुतेक सगळे जुने कपडे होते. मदतीची रक्कम सांगितली ती सुमारें पंचवीस रुपये! म्हणजे रुपया बारा आणे जेमतेम एकेकाच्या वांट्याला आले असते!

वांटणीला सुरुवात झाली. बायका पुढें होत्या. पाहून, बेतून त्या कपडे उचलीत. मध्येंच भांडणें सुरू होत. पुन्हां समजुती निघत. त्यांच्यापैकीं

प्रत्येक जण वर्ष दोन वर्षांपूर्वी मिळवता होता. एवढ्यांतच भिकेची वृत्ति त्यांच्यांत मुरून गेली होती! त्या गांवदानांत नव्हतीं फक्त दोघेंच. हॅर्टा आणि तिची आई.

बोट सुएझच्या कालव्यांतून जात होती. हवेंत फरक पडला. दोन्ही बाजूस वाळवंट. दूर एखादी खजुराची राई क्वचित् दिसे. उजव्या बाजूस सुएझ रेल्वे. तिचीं छोटीं स्टेशनें येत. त्याभोंवतीं लावलेली थोडीं झाडें दिसत. दृष्टीला हिरवळीचा गारवा तेवढाच. बाकी सगळें वैराण.

ऊन चढूं लागलें. गरम वाऱ्याच्या झळा सुरू झाल्या. नुकतेच युरोपांतून सगळे आलेले. तगमग सुरू झाली. दुपारीं दोनतीनच्या सुमारास तर यहुद्यांच्या तोंडचें पाणी पळालें. सगळे निपचित पडून होते.

संध्याकाळीं आम्ही दोघेचौघे हिंदी उभे होतों. यहुद्यांना मदत करण्यावरून बोलणें निघालें. सहायनें थट्टेनें म्हटले, " मि. चक्रधर आणि मदनानी यांना वर्गणी माफ करावी असें मी सुचवतों. "

मायकेलनें भोळेपणाचें सोंग घेऊन म्हटलें, " असं कां? वर्गणी द्यायची तर सगळ्यांनींच दिली पाहिजे. "

चटर्जी उभे होते. त्यांनीं छद्मीपणानें उत्तर दिलें, " त्यांना माफ करू या. यहुद्यांचा उद्धार आपआपल्या परीने त्यांनीं चालविलाच आहे! "

सहायनें म्हटले, " थट्टा राहूं द्या. मी यादी करतों. तुम्ही आंकडे टाका. मंडल, तुझं नांव प्रथम. किती टाकूं आंकडा? "

योगेश्वर मंडल कठड्याला रेलून बाहेर बघत होता. त्यानें तिरसटपणें उत्तर दिलें, " या घरबुडव्या यहुद्यांना मदत करण्याची माझी इच्छा नाहीं. "

सगळेच थक्क झाले. सहायनें फाउंटन पेन काढली होती. तिचें टोपण लावीत त्याला उपहासानें म्हटलें, " तूं दोनच वर्षें जर्मनीत होतास. तेवढ्यांत कट्टा नाझी झालास वाटतं?

मंडलनें उत्तेजित होऊन उत्तर दिलें, " देशद्रोह्यांचा द्वेष करायला नाझीच व्हायला नको! "

मायकेलनें मान हलवून, मंडलची आशा उरली नाही असा आविर्भाव केला. चॅटर्जी हंसत बोलले, " हिटलरचें 'माईन काम्फ' तुम्ही पाठ करून ठेवलेलं दिसतं आहे ! "

"ज्यूंनी जर्मनी बुडवला असं फक्त हिटलरच म्हणतो असं नाहीं. सगळा जर्मनी तेंच म्हणतो आहे ! "

मी पुढें होऊन म्हटलें, " जर्मनी बुडवला म्हणतां. असं ज्यूंनीं काय केलं आहे ? "

मंडलनें आवेशानें म्हटलें, " ज्यूंनीं काय केलं नाहीं तें विचारा. मागच्या महायुद्धांत याच घरभेद्यांनी जर्मनीचा गळा सफै कापला. यहुद्यांनीं जर्मन-राष्ट्राची युद्धरहस्यें शत्रूंना विकली. जगभर युद्धकर्ज उभारून लढाई चालू ठेवणाऱ्या दोस्तांची तिजोरी यहुद्यांच्या भांडवलानेंच भरली ! ज्यूंच्या शस्त्रांच्या कारखान्यांत बॉम्ब तयार होत, त्यांत माती सांपडे. त्यांनीं पुरविलेल्या सैनिकांच्या पोषाखांत, बुटांत झाडाच्या साली भरलेल्या असत. युद्धकाळीं जर्मनीला पुरविलेलं अन्नसुद्धां निकस, निःसत्त्व असे. तमाखूंत लाकडाचा भुसा असे. नफेबाजीच्या लोभानें यहुद्यांनी जर्मन राष्ट्र गारद झालं त्याची पर्वा केली नाहीं ! "

शिंदे पुढें येऊन शांतपणें म्हणाले, " हा यहुद्यांच्या जातीचा दोष नाही. नफेबाजीवर आधारलेल्या समाजस्थितीचा आहे. तुम्ही सांगतां हें सगळं जर्मनींतच झालं असं का तुम्हांला वाटतं ? इंग्लंडमधंहि तें झालं. लढाईच्या वेळीं अमेरिकन कंपन्यांना मालाची कंत्राटं दिलीं जात. त्यांपैकीं पुष्कळांतून जर्मनांचं भांडवल आहे अशा नुसत्या भूमका उठवून आपल्याला पाहिजे तीं कॉंट्रॅक्ट्स् मिळविणारे कारखानदार इंग्लंडमधंहि आहेत. तुम्ही सांगतां तसलंच अन्नहि इंग्लंडमधं विकलं गेलं. तसलेच जोडे आणि पोषाख पुष्कळदां पुरवले गेले. "

मायकेलला स्फुरण येऊन त्यानें म्हटलें, "इंग्लंड, फ्रान्स आणि जर्मनी किंवा मागचें महायुद्ध यांच्या गोष्टी कशाला सांगतां ? खुद्द हिंदुस्थानांत

काय झालं ? असहकारितेच्या चळवळीच्या वेळीं लोकांच्या भावनेचा व्यापाऱ्यांनीं फायदा घेतलाच कीं नाहीं ? गिरण्यांचा माल खादी म्हणून विकायचा, जपानी माल स्वदेशी म्हणून उठवायचा, हे धंदे झाले ना ? मग काय, या सगळ्यांचं तुम्ही शिरकाण करणार आहां ? ”

मंडल स्तब्ध झाला. त्याचे डोळे लाल झाले होते. निश्चयी स्वरांत त्यानें म्हटले, “ अलबत करूं. ज्यांनी राष्ट्राच्या प्रगतीच्या आड येण्याचं पाप स्वार्थासाठीं केलं आहे त्यांची आठवण आम्हांला आहे. त्यांचा अवश्य सूड घेतला जाईल ! ”

मायकेलनें चिडून म्हटलें, “ स्वार्थासाठीं धडपडत नाहीं असं हिंदुस्थानांत कुणी तुम्हाला आढळलं आहे काय ? ”

त्यानें चिडून म्हटलें, “ तें नाहीं सांगत, पण स्वार्थासाठी हिंदी राष्ट्राच्या हितावर उदार होतं कोण लवकर हें पाहिजे तर सांगतों.”

त्याला डिंवचण्यासाठीं मन्नान पुढें होऊन म्हणाला, “ हिम्मत असेल तर सांगा. ”

“ त्याला हिंमत कशाला पाहिजे ? मॉयनॉरिटीच्या नांवानें जास्त अधिकार लुबाडूं पहाणाऱ्या जाती आमच्यांत आहेत. स्वातंत्र्य दूर गेलं तरी हरकत नाहीं, पण आपली पोळी पिकली पाहिजे हेंच त्यांचं राष्ट्रीय तत्त्वज्ञान—”

त्याला अडवून मन्नान आवेशानं म्हणाला, “ त्यांची यहुद्यासारखी स्थिति करायची हें तुमचं ध्येय आहे म्हणतां ? ”

मंडलनें उत्तर दिलें, “ त्यांचे वेळेवर डोळे उघडले नाहीत तर तोच परिणाम होईल यांत मुळीच संशय नाहीं ! ”

मायकेलला मंडलचा हिंदी ख्रिस्त्यांबद्दलचा टोला सहन झाला नव्हता. त्यानें खिजवीत म्हटलें, “ तसा प्रयत्न केलात तर काय होईल असें तुम्हांला वाटतें ? ”

मन्नाननें सांगितलें, “ मी सांगतों काय होईल तें. पॅलेस्टाईन यहुद्यांचें होतें. आज आरबांचं झालं आहे. हिंदुस्थानचें नांव बदलून जाणंहि अशक्य

नाहीं ! आजच कॅांग्रेसनें पारशांचा, ख्रिस्त्यांचा, मुसलमानांचा इतका छळ चालविला आहे कीं कदाचित् एका पिढींतहि तें घडून येईल !"

शिंदे संतापानें लाल झाले. मन्नानला म्हणाले, "हिंदुस्थान नांव जाईलहि कदाचित्. पण तें बदलूं पहाणाऱ्यांपैकीं कुणी नवीन नांव ठेवण्यासाठी मागं जीवंत राहील ही आशा ठेऊं नका !"

याच वेळीं तो विलक्षण प्रकार घडला. आम्ही किनाऱ्याच्या बाजूला उभे होतों. समोर दुसरें जहाज होतें. कालवा अगदीं लहान. जवळ जवळ खेटूनच तें जहाज जात होतें. एकाएकी दोन्ही जहाजांवर आरडाओरड सुरू झाली.

दोन्ही जहाजांच्या डेकवर खलाशी उभे होते. बहुतेकांच्या हातांत जेवणाच्या वेळचे चाकू कांटे. कांहीं थोड्यांच्या हातांत काठ्या होत्या. शिवीगाळीला ऊत आला होता. त्या चाकूंनी एकमेकांचे गळे कापण्याचे आविर्भाव सगळे करीत होते ! जहाजांवरून लष्करी शिस्त असते म्हणूनच त्या दिवशीं आम्ही बचावलों. हळुहळू ते जहाज मागें गेलें.

ती फ्रेंच बोट होती. आमची इटालिअन बोट होती. आमच्या बोटीवरून कुणी तरी ओरडून फ्रान्सचा अपमान केला. त्याबरोबर दोन फ्रेंच खलाशी डेकच्या कठड्यावर चढले. त्यांपैकी एकानें मुसोलिनीसारखें बोलण्याचा आवेशाचा आविर्भाव केला. दुसऱ्यानें त्याचे बूट जिभेनें चाटत, 'ड्यूचे, ड्यूचे' म्हणून छाती पिटायला आरंभ केला. मुसोलिनी झालेल्या खलाशानें बोलतां बोलतां जबडा खूप उघडला. कांहीं केल्या तो मिटतां येईना. त्याबरोबर तिसऱ्या एका खलाशानें वर चढून त्याच्या हनुवटीवर खालून ठोसा दिला, तोंड मिटलें व म्हटलें, "मूर्खा, शक्तीपेक्षां जास्त तोंड वासतोस कशाला ?" सगळे धांवले. थोडी चिल्लर जिनसांची फेंकाफेंक झाली. आम्ही गेलों तेव्हां भांडण कळसाला पोचलें होतें !

यहुद्यांना द्यावयाची मदत तितकीच राहिली. युरोपचें रणांगण होतें आहे; युरोपमध्यें आग असली तर हिंदुस्थान फुफाट्यांत आहे; यहुदी आधणांत

असले तर आपण सुपांत आहोंत, असलेच विचार माझ्या मनांत चालू होत
झोपेंतहि आपण व्हेसुव्हिअसच्या तोंडावर बसलों आहोंत असलींचं स्व
पडलीं !

## —२६—

सकाळीं लुईची आई माझ्या खोलीत आली. तिनें निरोप सांगितल
" तुम्हाला डॉक्टर बोलावीत आहेत. "

पोर्ट सैदला वारा लागून लुई आजारी पडला होता. शिंदे रात्रभर त्याच
बिछान्याशीं बसून होते. केबिन बायकांची होती. डॉक्टर रात्रभर खोली
त्यामुळें त्यांची अडचण झाली होती.

लुईला माझ्या खोलींत आणलें. मी, डॉक्टर शिंदे आणि त्याची आ
सगळे मिळून त्याच्या शुश्रूषेला आरंभ केला. आम्ही तिथें बसून रहाण्य
तास वांटून घेतले. पण आई बहुधा चोवीस तास तिथेंच असे. शिंदे
क्वचित्च त्याला सोडून जात. मीं पुष्कळ सांगून पाहिलें, पण ते ऐकत न

दुसऱ्या दिवशींहि तापाला उतार पडला नाहीं. त्याचें हंसूं मावळ
होतें. चेहरा मलूल झाला होता. तांबड्या समुद्रांतल्या उनाची तलख
त्याची सारखी तगमग चाले. संध्याकाळीं तर वात झाल्यासारखा झाल
पोर्ट सैदच्या रात्री शिंद्यांनीं त्याला इंग्रजी शिकवलें होतें तेंच तो पुन
पुन्हां बोले.

त्या रात्रीं आम्हीं दोघे घाबरलों. पण शिंदे डगमगले नाहींत. त्या
बडबडीनें त्यांचें काळीज कासावीस होई. पण त्यांची शुश्रूषा धिमेपण
चालली होती. वारंवार घामाचीं पांघरुणें बदलावीं लागत. हातापाय
औषधें लावावीं लागत. त्याला दूध पाजावें लागे. फळाचे रस काढावे लाग
सगळें ते स्वतः करीत. लुईची आई भांबावल्यासारखी बर्थवरच पायथ्य
बसून राही. तिला वेड लागेल कीं काय याची मला भीति वाटे. ती शिंद्य

प्रश्न विचारी. आशेचा संभव नसतांना ते उगीच खोटा धीर देताहेत असें तिला वाटे.

शिंदे एकदां मला म्हणाले, "मी याला वांचवीन असा मला भरंवसा आहे. लहान मुलं आजाराला चांगलीं. त्यांना मृत्यूच्या कल्पना नसतात. मेलों तर काय मागं सोडावं लागेल याच्या विवंचना नसतात. त्यांची शक्ति नसत्या काळज्यांनीं खंगत नाहीं. रोगाच्या आघातांना विरोध करण्याचं तिचं काम सारखं चालू असतं."

त्या तीन दिवसांत हॅर्टाची माझी भेट क्वचित्च झाली. लुईच्या समाचाराला ती माझ्या केबिनमध्यें येई तेव्हां थोडें बोलणें होई तितकेंच. लुईच्या शुश्रूषेची तिनें तयारी दाखविली. शिंद्यांनीं तिला साभार नकार दिला. त्यांनीं सांगितलें, "त्याची आईसुद्धां मला नको आहे इथं. पण नाइलाज म्हणून तिला इथं बसूं देतों आहें. माणसं जितकीं जास्त तितकी शिस्त कमी होते. शुश्रूषेंत गोंधळ होतो!"

एडन आलें त्या सकाळी लुईला उतार पडला. ताप कमी झाला. त्याला ओळख पटूं लागली. आपण होऊन खायला प्यायला मागणें सुचूं लागलें. सकाळी त्यानें शिंद्यांना हांक मारली. कॉफी मागितली. त्यावेळीं शिंद्यांचे डोळे भरून आले. त्यांनीं त्याला कॉफी पाजली. मागच्या भिंतीला डोकें टेकलें. डोळे मिटले तिथेंच त्यांना झोंप लागली. पोर्ट सैदनंतर त्यांची झोप अशी ती पहिलीच.

लुईला त्याच्या केबिनमध्यें नेऊन ठेवलें. अंगावर पांघरूण टाकलें. डॉक्टर ओणवले होते ते उभे राहिले. त्याबरोबर त्याच्या आईनें त्यांना मिठी मारली. स्फुंदत म्हटलें, "डॉक्टर, तुम्ही होतांत म्हणून लुई वांचला, मी वांचलें."

शांघायला जाणाऱ्या प्रवाशांना देवी आणि कॉलऱ्याचें टोंचून घ्यावें लागतें. ज्या दिवशीं ही नोटीस लागली त्याच दिवशीं भूमका उठली, टोंचून घेण्याबद्दल फी द्यावी लागते सुमारें एक पौंड – चवदा रुपये. खरें खोटें कुणाला कळेना. टोंचून घेतलें नाहीं तर शांघायला उतरूं देणार नाहींत ही भीति.

याच भीतीचा मदनानीनें उपयोग करून घेतला होता. मार्थाला पैशाची लालूच दाखवून तिचा फायदा घेतला. त्याच्या स्नेह्यांना या गोष्टी कळल्यावर तेहि त्या चैनींत भागीदार झाले. सगळ्या यहुद्यांना ही गोष्ट कळली होती.

लुईला ताप आल्याबरोबर त्याच्या आईचें धाबें दणाणलें! मूल आजारी. कुणाचा आधार नाहीं. जवळ छदाम नाहीं! जिथें साध्या टोंचण्याला पौन्ड पडतो तिथें जोराचा आजार निभवायचा कसा आणि पैसे कुठले आणायचे? तिच्या डोक्यांत मार्थाचे विचार घोळूं लागले. मूल गमवायचें कीं आत्म-घाताला प्रवृत्त व्हायचें!

एडन गेलें. बोट उघड्या समुद्रांत आली. पावसाळ्याचे दिवस. वादळाचें थैमान सुरू झालें. बोट हलूं लागली. सुळकांड्या मारूं लागली. लाटा क्वचित् डेकवर येऊन आपटत. खुर्चीवर बसलें तरी केव्हां भिजायला होईल याचा नेम वाटेना. समोर बघण्याचा धीर होईना. चहूंकडचें क्षितिज हिंदोळ्यावर चढल्यासारखें झालें होतें!

समुद्राची लागवण पसरली. बहुतेक सगळे हैराण झाले. खाणेंपिणें सुचेना. सरळ चालतां येईना. उठून उभें राहिलें कीं कलकलल्यासारखें होई. पोटांतलीं आंतडी पिळवटत. केव्हां एकदम नाहीशीं झाल्यासारखी होत. आणि कंबर खचल्यासारखें माणूस खालीं बसे.

मला बोट लागली. त्यांतच आधींच्या जाग्रणाची भर पडली. थोडासा तापहि आला. मीं केबिनमध्यें निजून होतों. पहिल्या दिवशीं हॅटी येऊन बसली होती. दुसरे दिवशीं तीहि निजली. शिंदे मात्र दोन्ही दिवस उभे होते. माझ्याजवळ येऊन बसत. लुईला आतां आराम पडला होता. त्यामुळें ते आनंदांत होते. सारखे त्याच्याविषयीं बोलत.

संध्याकाळीं ते खोलीत आले. मला बरें वाटत होतें. मी उठून बसलों होतों. त्यांना म्हटलें, "मला डेकवर नेतां का? मोकळ्या हवेंत जरा बरं वाटेल."

त्यांनीं नकार दिला. दोन दिवस पडून राह्यला सांगितलें. मीं म्हटलें, "दोन दिवसांनीं तर मुंबईच!"

ते हंसून म्हणाले, " मग बिघडलं कुठं ? "

मी सांगितलें, " मला वर जायचं आहे. हॅटीला भेटायची इच्छा आहे ! "

शिंदे गंभीरपणें मान हलवून म्हणाले, " तुमच्या आणि लुईच्या आजाराचा एक फायदा झाला. त्या कार्टीच्या तावडींतून तुम्ही सुटलांत ! "

त्यांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां मी म्हटलें, " डॉक्टर, मला तिला भेटायची इच्छा आहे. तुम्ही तिला माझा निरोप सांगतां का ? "

" सांगतों पाहिजे तर ! पण ती येईल असें वाटत नाही मला. दिवसभर डेकवर पडून असते. तिच्यानें उठवत नाहीं. चालवत नाहीं. मन्नान सारखा जवळ बसून असतो. तिची काळजी घेतो. हवं नको सगळं करतो. रात्रीं जवळ जवळ तिला उचलून केबिनमधं घेऊन जातो. इतक्यांतून ती तुमच्याकडे येणार केव्हां ? "

कांहीहि उत्तर न देतां मी बिछान्यावर अंग टाकले. शिंदे स्वतःशी पुटपुटले, "That's sensible !"

## —२७—

रात्रीं नऊच्या सुमारास हॅटी केबिनमध्यें आली. झोंक जात होते. सगळ्या शरीरावर शीण दिसत होता.

माझ्या गादीवर दोन सफरचंदें ठेवून ती म्हणाली, " डॉक्टर सांगत होते. तूं कांहीं खात नाहींस. ही फळं खाऊन बघ. पुष्कळ बरं वाटेल."

माझें मन विषादानें भरलें होतें. मीं उत्तर दिलें, " कशावरच इच्छा नाहीं, हॅटी."

तिनें आग्रह केला, " तूं थोडीशी ब्रँडी घेतोस का ? समुद्राच्या आजारावर ब्रँडी फार चांगली."

थोडा वेळ थांबून मी उत्तर दिलें, " बरं घेईन. जरा वेळानें बारमधून मागवून घेतों."

हातांतला रुमाल उलगडीत ती म्हणाली, “ अर्धी पेग घ्यायचा त्याला बारचे पैसे कशाला ? ” रुमालांत लहानशी बाटली होती. सिंकवरचा पेला उचलीत ती पुढे म्हणाली, “ मला ब्रँडीनेंच थोडं बरं वाटतं. आई तर ब्रँडीवरच जीवंत आहे.”

तिनें पेला पुढें केला. मी उठून बसलों. चिडून म्हटलें, “ हॅर्टी, कृपा करून तूं जा. कां तूं मला छळतेस ? ”

पण ती रागावली नाही. तिला थोडें हंसूं आलें. पेला पुढें करून तिनें म्हटले, “ हं, घेऊन टाक. मग मी जातें.”

मीं उत्तेजित होऊन म्हटले, “ कां तुझा हा लोभ करण्याचा हट्ट ? तुझा लोभ मला असह्य होतो. तुला ठाऊक आहे. आपल्या वागण्याला शेवट नाहीं. आपलं लग्न होणं शक्य नाहीं ! ”

तिनें हताश होऊन माझ्या मांडीवर उभ्याउभ्याच डोके टाकलें. “ बॉब, किती वेळां सांगशील ? मला सगळं ठाऊक आहे. कशाची आशा नाहीं. समोर आहेस तोंवर तुझ्यावर लोभ करण्याचं माझं सुख सुद्धां हिरावून घेऊन तुला काय मिळणार आहे ? ”

मीं ब्रँडी घेतली. पुन्हां बिछान्यावर पडलों.

विचार करायचे नाहींत म्हणून ते थांबतील का ? तुटून पडलेली दरड दरीपर्यंत जायचीच. हॅर्टी मला आवडते. हॅर्टीवर माझें प्रेम आहे. पण हॅर्टीशीं लग्न करणें शहाणपणाचें होईल का ? प्रेम निराळें आणि लग्न निराळें. विवाह ही प्रेमाची परिणति नव्हे. तो प्रेमाचा शिळा पोळा आहे ! महाराष्ट्रांतल्या अनेक प्रीतिविवाहांचे इतिहास मला ठाऊक होते. त्या माणसांच्या मनांचे निखारे विझून आतां कोळसे आणि राख उरली आहे ! प्रीतिविवाहावरच्या कादंबऱ्या मी वाचतों. त्या सगळ्या विवाहापूर्वीचा प्रीतीचा सुंदर धीराचा प्रवास रंगवतात. लग्नानंतरचा प्रीतीचा शिळेपणा ओळखण्याचें धाष्ट्यं कुणास होत नाहीं. जिथें सुरुवात व्हावी तिथें शेवट करून सगळे मोकळे होतात.

मला निष्ठेची भीति वाटूं लागली होती. मित्राने गळा कापला तर मरणप्राय दुःख होतें. भागीदारानें फसविलें तर व्यवहार म्हणून माणूस सतत विवंचनेच्या संकटातून सोडवणूक करून घेतो. कुसुमच्या भरंवसा राहिला नाहीं, तिथें हॅर्टाचा कसला भरंवसा ? आणि भरंवशाची अपेक्षा करण्याचा अधिकार तरी आपल्याला काय उरला आहे ? उद्यांचा दिवस उलटला, परवां मुंबई आली की दोघांचीहि सुटका होईल. चार आठ दिवस आठवण येईल. काळाच्या सहाणेवर मोठाली दुःखें घासून झिजून जातात.

## —२८—

बोटीवर सगळें होतें. पण कॅलेंडर दिसले नाहीं. दिवस कोणचा तें क्वचित्च कळे. एखादे बंदर आलें म्हणजेच तारीख उजाडल्यासारखी वाटे. एरवीं नुसतें पाणी, प्रकाश, काळोख आणि आकाश. अवकाशाच्या विशाल बोगद्यांतून सारखा प्रवास चालू होता !

पण आज परिचारकांची धांदल सुरू झाली. सामानावर कस्टम्सचे नंबर्स लागले. बांधाबांध सुरू झाली. धोब्याकडचे कपडे येऊन पडले. न्हाव्याच्या दुकानांत जागा मिळेना. फोटोग्राफरकडची पाकिटें, प्रवासांतलीं इतर बिलें आलीं. स्नेहाच्या आठवणींची देवाणघेवाण सुरू झाली. उद्यां...तारीख. उद्यां मुंबई.

पण उद्यां म्हणजे बारा तास. घाई सगळ्यांनाच होती. उद्यांच्या दिवसांत केव्हां ? किती वाजतां ? बातम्या उठूं लागल्या. अंतरांचे हिशेब सुरू झाले. अंदाज होता संध्याकाळपर्यंत पोहोंचूं. म्हणजे अजून चोवीस तास. माझें मन शांत होतें.

बोट हिंदुस्थानच्या किनाऱ्याकडे येऊं लागली तसतसा समुद्र शांत होत होता. वातावरण सगळें धूसर झालें होतें. आकाश मलीन, पाणी गढूळलेलें दिसे. तीन दिवसांच्या बेसुमार दांडगाईनें पंचमहाभूतें थकल्यासारखीं झालीं होतीं.

सगळे डेकवर उभे होते. आज एका ठिकाणी. उद्यां याच वेळीं सगळे पांगलेले. पुन्हां आयुष्यांत भेटतील न भेटतील. बोलणीं चाललीं होतीं तीं हि घरच्या ओढीबद्दलचीं. बंदरावर कोण येईल, मुंबईला किती दिवस राहणार, कोणच्या गाडीनें पुढें जाणार, घरीं केव्हां पोहोंचू, इतक्या दिवसांनीं काय फरक वाटेल ?

प्रिय माणसांच्या, प्रिय स्थळांच्या, प्रिय वस्तूंच्या सगळ्या आठवणी.

यहुद्यांचे चेहेरे आतां डोळ्यासमोर येतात. त्यांना आमच्या भाषा कळत नव्हत्या. पण आमच्या चेहेऱ्यावरचे भावच इतके बोलके होते ! अर्थासाठीं भाषेची गरज नव्हती. कांहीं बोललें तरी त्याच ध्रुपदावर शेवटीं येई. हिंदुस्थान, मुंबई आणि अखेर घर, घर, घर !

आम्हीं उद्यां सुटणारे बंदिवान होतों, ते जन्मठेपीचे निर्वासित होते !

फोटोची कल्पना प्रथम शिंद्यांनीं काढली. त्यांनींच कॅमेरा आणला. त्यांचा आणि लुईचा फोटो मीं काढला. हां हां म्हणतां फोटोची सांथच आली. मावतील तेवढे एकदम, एका प्रांताचे, भाषेचे, एका केबिनमधले, एका बैठकींतले, सगळ्यांचे सगळ्या तऱ्हेचे फोटो निघाले. सगळेच उभे होतों. कायटेल आला आणि म्हणाला, " आपला सगळ्यांचा फोटो असावा अशी इच्छा आहे." सगळे उभे राहिलों. मन्नान, मी, हॅर्टी आणि इतर यहुदी. त्या धांदलींतच हॅर्टी हळूच म्हणाली, " तुझा नि माझा फोटो काढायचा अं निराळा ! " मीं कबूल केलें.

मन्नानचे दोन मुसलमान स्नेही समोर उभे होते. मन्नाननें हॅर्टीचें बोलणें ऐकलें. तो आपल्या स्नेह्यांजवळ जाऊन आला आणि तिच्याशीं बोलूं लागला. एकानें ओरडून म्हटलें, " भई, तजबीर निकालता हूं. जोरू को साथ लेके बैठो. "

हॅर्टीनें मान हलवून नकार दिला. त्या स्नेह्यानें पुन्हां म्हटलें, " रातदिन तुम्हारे साथ बैठा करती थी. अब पांच मिनिटके वास्ते शरमाती है ? "

मन्नाननें हंसून उत्तर दिलें, " भई मानती नही है."

" वा यार ! मानती कैसी नही ? मरद हो या कौन ? "

" लेकिन शादी नही हुआी है न ! नही तो देख लेता ! " असें म्हणून तो हंसला.

मी सगळें ऐकत होतों. हॅर्टी त्या दोघांकडे पाळीनें बघत होती. काय बोलताहेत तें तिला कळेना. माझ्या मनांत एक विचित्र भावना उमटून गेली. एक यहुदी पोर. तिचें एका ब्राह्मणावर प्रेम. एका मुसलमानाला तिच्याबद्दल ओढ. मीं लग्न केलें तर रोजचें अन्नसुद्धां तिला माझ्या घरांत निराळें खावें लागेल. त्याने केलें तर रहाणी निराळी, खाणें निराळें. वयाची इतकीं वर्षें हिची गेलेलीं. हिचे आचार निराळे, अपेक्षा निराळ्या, आणि जें घर आतां इथून पुढें कधींकाळीं हिला मिळेल त्याचे कुळाचार, वातावरण यांनीं स्वतःच्या आयुष्याला मुरड घालायला किती म्हणून हिला तयार व्हावें लागेल !

हॅर्टीनें निश्चयानें फोटोसाठीं नकार दिला. त्या स्नेह्यानें मन्नानला डोळा घातला. तूं तिच्याशीं बोलतो आहेस असेंच चित्र घेतों असें खुणविलें.

क्षणमात्र मन्नानला मोह पडला. त्यानें तिच्या कमरेभोंवतीं सहज म्हणून हात घातला. पण तिनें त्या सलगीचा निषेध केला. त्यावरोबर तो भानावर आला. दूर सरला. त्यानें स्नेह्याला सांगितलें, " उसकी मर्जी नही है. छोडो. "

तिनें आरामखुर्चीवर अंग टाकलें आणि मला विचारलें, " आपला काढायचा ना फोटो ? केव्हां तो ? " मी शिंद्यांची वाट बघत होतों. तिला सांगितलें. भोंवतालीं सगळे बोलतच होतों. हरमान म्हणाला, " तुम्हाला आतां पुढचे चोवीस तास जड जातील नाहीं ? " मीं म्हटलें, " होय. अर्थातच. " पण त्याचा अर्थ निराळा होता. माझ्या उत्तराची भावना अर्थात् निराळी होती.

शिंदे दारांतून आले. ते हंसत होते. मला पाहिल्याबरोबर म्हणाले, " मी खुषखबर आणली आहे. फर्स्ट क्लासमध्यें नोटीस लागली आहे ! "

हॅर्टा एकदम उठून बसली. म्हणाली, “ कसली ? ”

“ बोट उद्यां सकाळीं आठ वाजतां मुंबईला पोंचणार.”

तिचा चेहरा पांढरा पडला. “ उद्यां संध्याकाळीं ना ? ”

“ नव्हे नव्हे. उद्यां सकाळीं.”

मी कठड्याशीं उभा होतों. शिंद्यांनीं माझ्याकडे पाहिलें. मी डोक्यावरची टोपी हवेंत उडवून म्हटलें, “ Bravo ! सकाळी घर येणार ! ”

हॅर्टा रागानें लाल झाली. खुर्चीवरून उठली आणि माझ्याकडे रोखून पाहूं लागली. ओठ आवळून धरले होते. वेडावल्यासारखें अभिवादन करून मला म्हणाली, “ Thank you very much for your eagerness.” मीहि थोडा उत्तेजित झालों होतों. उलट अभिवादन करून म्हटलें, “ Please Frauline. ”

## —२९—

सहज फेंकलेला खडा. पण तो एखाद्या पांखराच्या वर्मी लागतो ! क्षणार्धांत त्या घावानें तिला झालेल्या वेदनेची कल्पना मला आली. तिच्या व्याकुळ स्वराचे पडसाद पुन्हां मनांत उमटले. सगळा आनंद मावळला. वृत्ति काळवंडल्या. त्यांच्या सावलींत उत्साहाचें रोपटें खुरटून गेलें.

मींच घाव घातला होता. माझेंच मन विषण्ण झालें. दंशानंतर सर्पाला सुद्धां ग्लानि येतेच !

माझ्यानें तिथें उभें राहवेना. आधींच अशक्तता आली होती. त्यांत हा शीण. कुणाकडे लक्ष न देतां मी केबिनकडे निघालों. आंत वळलों, आणि जिन्यावर पाऊल ठेवलें, तोंच हॅर्टाचा आवाज ऐकला, “ बॉब ! बॉब ! Oh God ! ”

मी चमकलों. वळून पाहिलें. कोठाराच्या तोंडच्या कोपऱ्याशीं आराम-खुर्चीवर हॅर्टाची आई पडली होती. पांढरे शुभ्र केस. दुःखानें करपलेला चेहरा. सुरकुतलेलें शरीर. बहात्तर हिंवाळ्यांची वाताहातच ती. हॅर्टा पायाशीं

बसली होती. नव्हे तिनें अंग टाकलें होतें. आईच्या मांडीत डोकें खुपसून रडत होती. तिचा उद्गार म्हणजे मला हांक नव्हती. मी जवळ होतों हें तिला ठाऊकहि नव्हतें. पुन्हां पुन्हां ती मान खालीं घाली आणि रडे. मी जवळ गेलों. तिला हांक मारली. तिनें वळून पाहिलें.

अरे देवा ! ही हॅर्टीच का ? तिच्या दृष्टींत ओळख नव्हती. नजरेला दिशाच नव्हती. पाणी वाहात होतें. पावसाच्या झोडीनें कळ्या मोडकळतात तसें त्या फुलणाऱ्या नाकपुड्यांचें झालें होतें. आणि ओठ ! माझें काळीज दुभंगलें ! तें वांकडें होत होतें ! तिनें ओठ हलवले. कष्टानें बोलण्याचा प्रयत्न केला. शब्द उमटेनात. ओठ उघडेनात. उघडले तों दातांची मिठी बसलेली ! !

तिनें मान खालीं घातली. आईच्या मांडींत तोंड लपविलें.

मी हतबुद्ध झालों. गोळी चाटून गेलेली हरणी जिवाच्या अदावतीनें धावते तसें तिचें मन त्या दुःखापासून पळूं पहात होतें. तिच्या आईचा हात तिचें मस्तक कुरवाळीत होता. क्षीणशक्ति झालेल्या त्या मांड्या, त्यांच्यात तिचें मस्तक दाबून धरण्याइतका आवेग कुठला उरणार !

हॅर्टीनें आईचा हात शिरावर दाबून धरायचा प्रयत्न केला. मांड्या आवळून बघितल्या. कुशींत शिरण्याचा प्रयत्न केला. पण मायेच्या दुधाचे झरे आटलेले ! समाधान होईना. आशाहि सुटेना. हताश होऊन तिनें आईकडे पाहिलें. म्हणत असावी, " आई, जन्म दिलास तो हवा होता कीं नाहीं न कळे. पण आतां रक्षणासाठीं पुन्हां पोटांत घे ! या जगाचा वारासुद्धां सोसवत नाही ! "

—३०—

हेच ते क्लेश ! " मनाला फार क्लेश झाले. तूं पाहिलं असतंस तर क्षमा केली असतीस, " असें उमा म्हणाली होती. केली असती का ? पण क्षमा

करायला माझें मन ठिकाणावर कुठें होतें ? त्याच्या ठिकऱ्या उडत होत्या. पुन्हां तुकडे जवळ येत, सांधले जात. दुःखाच्या नव्या आघातानें पुन्हां ठिकऱ्या उडत.

काय हिला असह्य होतें आहे ? वियोग ? पण तो होणारच होता. ज्यांत आपण बुडणार हें नक्की माहीत होतें अशा स्नेहाच्या डोहांत तिनें जाणून बुजूनच उडी घेतली नव्हती का ? केवळ त्याच्या अथांग खोलीला भुलून ? भोंवतालच्या चांदण्याच्या मुक्या शोभेनें हुरळून ? एकाच मोहानें. मनांतला वणवा पाण्याच्या पहिल्या स्पर्शानें विझला तर तेवढाच विझेल ! पुढें कांहीं होवो ! सगळें खरें, पण प्राण देण्याचा निश्चय करणें निराळें — जीव जातांना शरीराची होणारी ती तडफड निराळी.

हिला मी रोज बघत होतों. रात्रीं हंसे. दिवसा खिन्न एकटीच बसे. कालची कहाणी ऐकली तेव्हां थोडा उमज पडूं लागला. ती तिची पहिली प्रीत. निष्ठेचे, सुविचाराचे धडे लहानपणापासून तिच्या मनानें गिरवले होते. तो त्या प्रीतीचा आधार. तिची भक्ति निष्ठेला पारखी होती असें मी कसें म्हणूं ? तिच्या शीलाची मला ओळख होती.

पण ती पहिली प्रीत हरपली. त्याहिपेक्षां भयंकर म्हणजे दुसरीचा जन्म झाला ! तेंच तिला असह्य झालें ! एका लहानशा देशांतल्या संस्कृतीचीं पुटें तिच्या मनावर चढलीं होतीं. प्रीतीचा जन्म एकदांच होतो; अखेर होते तीही एकदांच, असा तिचा समज होता. पण इतक्या पुटांतूनहि तिचें मूळचें स्त्रीमन स्वतःचें रूप घेऊन प्रकट झालें. त्याची ओळख तिला पटेना. त्याची पाऱ्यासारखी अस्थिरता, वीजेसारखी लवलव, त्याचें चैतन्य तिला सहन होईना ! हें स्वरूप आपलेंच हें खरें ! पण मग आपण आजवर घडवलेलें, ओळखून ठेवलेलें स्वतःचें मन ? तें कुठें आहे ? दूर उभें राहून द्रोही म्हणून माझा धिःकार करतें आहे तेंच का ?

सगळें खरें, पण कशाला कांहीं इलाज होता का ? कालच्या प्रीतीच्या स्मृति. रोज उजळायला मिळत तेव्हां चांदण्यांसारख्या चमकत. निखळून

पडल्या तेव्हां त्यांच्या उल्का झाल्या. त्या दगडांनीं तिच्यावरच आदळून तिची समाधि बांधली. पण तिचें मन पुरें मेलें नव्हतें. नव्या प्रीतीच्या फुंकरानें त्याला संजीवनी मिळाली. त्यानें नवी सृष्टी उठवली, नवें आकाश उभें केलें. आतां तेंहि फाटलें. अंगावर कोसळून पडलें !

त्याच्या अपघातानें ती हतबुद्ध झाली !

## —३१—

दोन तासांनी हॅर्टा माझ्या केबिनमध्यें आली. शिंदे आणि मायकेल बसले होते. सामान आवरणें चालू होतें. मी वरच्या बर्थवर पडलों होतों.

तिला संकोच वाटला नाहीं. ती गोंधळली नाहीं. कुणाकडेहि तिनें लक्ष दिलें नाहीं. माझ्या अंगावर हात ठेवला व म्हटलें, " हें काय ? तुला पुन्हां ताप आला वाटतं ? "

मी वळलों. उठून बसलों. तिचा हात हातांत घेतला व उत्तर दिलें, " छे ग. नुसता थकून पडलों होतों. "

मला आश्चर्य वाटलें. तिनें नवा पोषाख घातला होता. पांढरा शुभ्र तलम रेशमाचा झगा. त्यावर गुलाबी फुलें. कानांत लोलक होते. डोळे चमकत होते. चेहऱ्यावर आनंदाचें चांदणें होतें.

तिनें म्हटलें, " अं हं. आज थकून चालायचं नाहीं. मी तुला खूप जागविणार आहें ! "

शिंदे एकदम म्हणाले, " फ्राउलाईन, आम्ही इथं खालीं बसलों आहों ! तुम्हांला आठवण नसली तर सांगतों ! "

तिनें हंसत म्हटलें, " मला आज कुणाचीच भीति वाटत नाहीं." नंतर ती वळली. दाराशीं गेल्यावर म्हणाली, " बॉब, नऊ वाजतां मी डेकवर तुझी वाट बघतें आं ? "

नऊ वाजतां डेकवर जाण्यासाठीं मी जिन्याकडे वळलों. तिथेंच हॅर्टा भेटली. तिच्या आग्रहामुळें मी पानगृहांत गेलों. बीर मागविली. परिचारकानें

सहीसाठीं पावती आणली. मी सही करीत होतों. मला अडवून ती म्हणाली, "थांब. मी तुला दारू प्यायला बोलाविलं. तूं माझा पाहुणा आहेस." मी कांहीं बोललों नाहीं.

परिचारक गेल्यावर तिनें हळूच विचारलें, "रागावलास होय?" मीं उत्तर दिलें, "रागावण्याचें सुद्धां त्राण उरलें नाहीं. पण हॅटी, तूं फार वाईट वागवलंस मला!"

"खरं? कसं रे?"

"अकरा दिवसांत तूं माझ्याजवळून कांहीं घेतलं नाहींस. सिगरेट्स् ओढल्यास त्या परत दिल्यास. इतक्या वेळां मीं विचारलं, पण कधीहि बरोबर दारू घेतली नाहीस, आणि आज आपल्या पैशाने मला बीर दिलीस. तूं एकदम श्रीमंत झाली आहेस होय?"

तिनें खूप जोरानें मान वरखालीं केली व म्हटलें, "होय. खूप श्रीमंत झाले आहे!"

मी चिडून विचारले, "मार्थासारखी?"

तिने रोषानें पाहिलें. दंडाला चिमटा घेतला आणि रागानें म्हटलें, "एकदां बोललास तें पुरे." नंतर थोड्या वेळानें हळुवारपणें म्हणाली, "बॉब, तुझ्याजवळून कांहीं घेतलं नाहीं म्हणतोस. घ्यायचं तें सगळं घेतलं आहे."

पानगृहांत आर्केस्ट्राचे स्वर उमटूं लागले. मी खुर्चीवर मागें रेललों. हळुहळू जोडपीं नाचूं लागलीं. धुराच्या वलयाकडे बघण्यांत मी दंग होतों.

तिनें हनुवटी पुढे केली. वांकून म्हटलें, "आळसावला आहेस?" मीं नुसतेंच म्हटले, "हूं." तिनें उसन्या रागाने म्हटले, "बॉव, तूं खोटा आहेस."

मी स्वतःशींच म्हटलें, "आहें खरंच. तुला आशा लावली आणि उद्यां जाणार!"

ती एकदम विव्हळ झाली. म्हणाली, “ चूप, त्याबद्दल बोलायचं नाहीं. नाहीं ना ? ”

मी हळूच उत्तर दिलें, “ बरं नाहीं. मग तूं असं कां म्हणतेस ? ”

तिनें आर्केस्ट्राकडे बोट दाखवून म्हटलें, “ हें संगीत कसलं आहे ओळख.”

मीं खांदे उडवल्यासारखें केलें. भोळेपणानें म्हटलें, “ कांहीं कल्पना येत नाहीं बुवा.”

माझ्या गालावर चापट मारून ती म्हणाली, “ खोटा कुठचा ! हा वाल्ट्स् आहे. तुला ठाऊक आहे. हा व्हिआनीज़ नाच आहे. आणि तुला छान नाचतां येतं हेंहि मला समजलं आहे ! ”

तिनेंच मला ओढलें. उठवलें. माझा हात आपल्या कमरेभोंवतीं घेतला. कॉलरमध्यें फूल खोचावें तशीं आपलीं बोटें माझ्या हाताच्या मिठीत दिलीं. पहिल्या पावलाची बुटांनीं उमटवलेली टाप मीं ऐकली. पुढें त्या चामड्याच्या टापासुद्धां संगीताच्या माधुरीनें मुक्या झाल्या ! बाहेर लाटांनी ताल धरला होता. आंत गीताच्या लयीला भरती आली होती. अनेक जोडपीं नाचत होतीं. जागजागीं शरीराचें लवलवणें ! पावलें हलकीं झालीं. दृष्टीवर धुकें पसरलें ! पाऊल पडे तें जोडपावलानें. दोघें एक झालों – अंतराचें भान सरले.

नाचाच्या निरनिराळ्या गति उमटल्या. ट्राम्बोन्सचा आवेश वाढला. व्हायोलियन्सचा थरकांप उडाला. लयींच्या त्या बेसुमार तुफानांत आम्ही हेलकावे खात होतों. तिची मुद्रा बावरल्यासारखी प्रथम होती. नंतर ओठांच्या कोंपऱ्यांशीं स्मिताचा उदय झाला. तिला भास झाला असावा, जहाज फुटलें, आपण वादळांत सांपडलों. आतां बुडणार !...नंतर सुवासिक पाण्याचा पाट वाहात होता. त्यांत ती धारेला लागली. कमळांचीं पानें, पाकळ्या शरीराला बिलगल्या. लहानपणच्या गोष्टींतल्या एका सुंदर राजपुत्रानें तिला अलगज पाण्यांतून उचललें. राजवाड्याकडे नेलें – वाटेंत कुरणांतल्या एका रोपट्यावर कोळ्याचें जाळें संध्येच्या उनांत चमकत होतें, त्यांत ती अडकली. त्यांतून निघाली तेव्हां त्याचे कोमल तंतु शरीराला बिलगले. ओल्या पाकळ्या

सुटत, पुन्हां चिकटत. त्या गार चुंबनांच्या वरसातीनें शरीर महिरून गेलें. रोमांच कुठले आणि तंतु कोणचे हें तिला कळेना !

महालांत अंधार होता. राजपुत्राचें बोलणें तिला ऐकूं येऊं लागलें. छताला सुंदर झुंबर लागलें होतें. त्या बोलण्यांतल्या प्रीतीचा सप्तरंगी प्रकाश त्या झुंबरांतून प्रकाशत गेला !

तिचे डोळे ओले झाले होते. निळ्या डोळ्यांच्या दोन सुंदर पुष्करिणी. अनेक सुंदर स्वप्नांची चिमणी पांखरें त्यांत आलीं. मनसोक्त पंख फडफडावून डुंबलीं. बाहेर येऊन विसावत बसलीं !

—३२—

पुन्हां असमाधानाचे सूर वाहूं लागले. दोघेहि बाहेर आलों. समोरच घड्याळ होतें. त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, "हें फोडून टाकूं का ? किती धांवतं आहे !"

जिन्याशी थांबून मी विचारलें, "कुणीकडे जायचं ?" तिने हताश होऊन म्हटलें, "तूंच सांग." मला कळेना. ती पुढे म्हणाली, "सांग ना बॉब. उगीच वेळ फुकट जातो आहे. कुठं जायचं ?" शेवटी ती त्रासली. "कंटा-ळला आहेस ना तूं ? बरं तर जा. जाऊन नीज." असें म्हणून ती वळली. मला तिच्या वागण्याचा अर्थच कळेना ! मी हांक मारली, "हॅर्टी."

ती उत्सुकतेनें वळली. "काय बॉब ?"

"कांही नाहीं. गुड नाइट."

हिरमुसून तिनें उत्तर दिलें, "बरं तर गुड नाख्ट !" नंतर एकाएकीं तिचा चेहरा खुलला. ती माझ्याजवळ आली. म्हणाली, "मला एकदम आठवण झाली जर्मनमध्यें गुड नाख्ट म्हटल्याबरोबर. स्वित्झरलंडमधल्या रेडिओवर रोज रात्रौ कार्यक्रम संपतांना गुडनाईट करतात. कसं म्हणतात सांगूं ? 'गुडनाख्ट मनदामिन, गुडनाख्ट मन हेरन. श्लाफन्ज्वेल मिदनांदर !"

मला हंसूं आलें. ते जर्मन शब्द मंत्रोच्चारासारखे वाटले! मी म्हटलें, " सुंदर आहे भारी, पण मला अर्थ नाहीं कळला!"

" चल आपण डेकवर जाऊं. मी सांगतें." असें म्हणत ती लगबगीनें जिन्याच्या पायरीवर चढली. तिथेंच थांबली व म्हणाली, " Oh! Dear! किती भयंकर उकडतं नाही?"

मी उत्तर दिलें, " मी डेकवर उभा राहतों. तूं पाण्यांत उडी टाक!"

तिला हंसूं आलें. माझ्या खांद्यावर डोकें ठेवून केंसांनी तिनें माझ्या मानेला, गालांना गुदगुल्या केल्या व म्हटलें, " बॉब, हंसणार नसशील तर सांगतें."

मी विचारलें, " काय हॅटी?"

" आपण पोहायला जाऊं या! येतोस?"

टाकींतलें पाणी हिंदकळत होतें. त्याला रात्रीचीं प्रतिबिंबें धरतां येत नव्हतीं. अंगावरचे पातळ रेशमी झगे आम्हीं काढले. माझ्या अंगांत पोहण्याचा पोषाख होता. तिच्या अंगांत स्त्रियांचा पोहण्याचा आकाशी रंगाचा पोषाख. शिडीवर चढलों. ती प्रथम पाण्यांत उतरली.

तिच्या कांतीनें पाणी उजळून निघालें. त्याच्या उचंबळीला भर आला. आम्ही दोघांनीहि एकमेकांचा पाठलाग सुरू केला.

टाकीच्या वर मधोमध एक लांकूड आडवें बांधलें होतें. थोडें थकल्यावर त्याला पाय अडवून मी तरंगत पडलों. तिनें पोहत जवळ येऊन माझ्या छातीवर मान टाकली. तिचे डोळे मिटलेले होते. केंस माझ्या गळ्याला मिठी मारीत होते. मध्येंच तिनें म्हटलें, " असंच रात्रभर निजूं या का?"

मी हंसून म्हटलें, " होय. सकाळी न्यूमोनिआनें मरायचें असेल तर!"

" सकाळचें सकाळीं. मी अशीच निजणार. Good night, बॉब. sleep well!"

त्याबरोबर मला आठवण झाली. मी विचारलें, " तूं मघाचा अर्थ सांगणार होतीस ना?"

"हो, सांगतें. गुड नाख्ट मनदामिन म्हणजे Good night ladies; गुड नाइट मनहेरन म्हणजे Good night Gentlemen. श्लाफन्‌ज्वेल मिदनांदर म्हणजे—"

पण तिनें अधिकच कुशींत शिरल्यासारखें केलें. लाजून म्हटलें, "नाहीं, सांगतां येत नाहीं, बॅाब."

मी तिला लोटून दिल्यासारखें केलें. तिचा तोल गेला. ती पाण्यांत खालीं गेली. पुन्हां वर आली. माझे पाय प्रथम तिच्या हातीं लागले. काळोखांत सगळं शरीर चांचपत तिचे हात माझ्या गळ्याशी आले. त्यांनीं मला मिठी मारली.

कधीं कधीं रात्रीच्या अंधारांत आपल्या ओठांनीं मी तिचे ओंठ शोधी आणि शेवटीं त्यांची मिठी बसे, तसें तें चाचपडणें आणि ती गळ्याची मिठी मला वाटली!

—३३—

दिव्याची ज्योत मोठी होते. वात भडकते. कांचेला तडा जातो. तुकडे पडतात. बाहेरच्या वाऱ्यानें ज्योत शांत होते. पण विझण्यापूर्वी मोठें होण्याचें सगळे तेज एकवटून एकदांच जळून घेण्याचें समाधान तिला मिळतें!

हॅर्टोच्या भडकलेल्या विकारांनीं सगळीं संकेतांचीं कवचे अशीच फोडली. एकदांच जळून घेण्यासाठीं ते मोकळे झाले!

तिनें स्वतःशीं मांडलेलें भांडण कसें असेल याची मी कल्पना करीत बसतों. एकदां वाटतें, असें असेल?

ती बिछान्यावर पडली. सगळे खेळ संपले. पण ते खेळच. त्यांत नाटक असतें. आव आणावा लागतो. त्यानें मनाचें समाधान होत नाहीं. सर्वस्व फेंकून, स्वतःला झोंकून देतां येत नाहीं. तिला असहाय वाटूं लागलें. जमीन पोखरून मुळें तोडावीं आणि झाड उभें ठेवावें! तें किती वेळ उभार धरणार? जीव टांगल्यासारखा होई. असुखाचे झंझावात सुटले. ती बहकत

होती. आधाराचा विसांवा मिळेल का? जमिनीला पाय लागतील का? निपचित पडून राहून ही शीण भागवतां येईल का?

तिची तळमळ सुरू झाली. अंगावर कांहीं नव्हतें. नुसतें पातळ पांघरूण. तरी नुक्तेंच पोहलेलें, न्हालेलें तिचें शरीर घामाझोकळ झालें! तिला सुचेना. एखाद्या वेळीं विमान पेटतें. पायलट पाराशूटची छत्री घेऊन अंतराळीं उडी टाकतो. छत्री उघडते. शरीर वजनानें खालीं ओढ घेते. वारा छत्री वर उचलतो. किती वेळ तो खेळ चालतो! पण आदळून कपाळमोक्ष होऊं नये म्हणून तो अवश्य असतो. किती वेळ लागेना? शेवटीं जमीन लागतेच ना? सुस्थित जीवनांतली कालची प्रीति तशीच होती. त्या खेळांत लज्जा, विभ्रम, संकोच, पाठशिवण, सगळ्या गंमतींना अवकाश होता. संकेत, लोकनीति, सगळ्यांच्या समाधानाला अवसर होता. आज नुसतेंच टांगल्यासारखें होतें आहे! नुसतीच तरंगते आहे! उद्यां सकाळीं तर धरणीकंपच! मग कुठली जमीन? कुठला आधार?

काळजाचें पाणी झालें. फक्त सहा तास. संकट समोर येऊन ठाकतें तेव्हां अजगराच्या श्वासासारखें माणसांना तें आपल्याकडे ओढून घेतें. एकदांचें तें येऊन डोक्यावर आदळावें अशी उतावीळ होतें. तिनें डोक्यावरून पांघरूण ओढलें. झोंप यावी, सकाळ उलटून जावी असे तिला झालें. एवीतेवीं फुटणारें सप्तरंगी प्रकाशाच्या खेळण्यानें तिला भुलविणारें हें प्रीतीचें झुंबर! श्वास रोधून त्याच्या फुटण्याच्या मंजुळ आवाजाकडे, खळखळाटाकडे कान लावून ती बसली. तिनें पांघरूण घेतलें आणि काळोखांत तोंड लपविलें.

पण तिच्या डोळ्यांना काळोख नको होता. धुंदीची अंधारी हवी होती. विचार! विचार! दहाच दिवसांपूर्वीं असेंच रात्रीं एक नवें जग समुद्रांतून वर आलें. त्यांत आपण खेळलों, बागडलों, जगलों! किती हिरिरीनें जगलों! उद्यां त्याचा अखेरचा अस्त होणार! पुन्हां आपलें मरण! पुन्हां पुन्हां जगायचें, मरायचें! आशा अपुऱ्या ठेवून आत्मघाताला तयार व्हायचें! पुन्हां तसेंच मनाचें भूत घोटाळणार!

नाहीं. आजच पुरा निकाल केला पाहिजे. दोन्ही हातांची ओंजळ करून दैवानें सुखाचा धबधबा सोडला होता. त्याखालीं आपण मनसोक्त न्हाऊन घेतलें – छे: मनसोक्त नव्हे! अजून तलखी होते आहे, अजून धार ओसंडते आहे! आतां फक्त सहा तास! हांकेच्या नव्हे, कुजबुजीच्या अंतरावर आपला प्रियकर आहे! हें अंतर कुणी ठेवलें? आपणच ना? बरोबर नाचलों तेव्हां संगीतानें शुद्ध हरपली. पोहलों तेव्हां पाण्याच्या लाटा आड आल्या. त्यांनीं गोड मुकेसुद्धां मचूळ केले!

अजून वेळ गेली नाहीं. याच क्षणाला, या पुढच्या प्रत्येक क्षणाला त्याच्या-जवळ राहीन. रात्रींत चांदणें पसरतें तशी त्याच्या सावळ्या शरीराला बिलगेन. त्याच्या स्पर्शानें या रक्तमांसाच्या देहाचें जडत्व नाहीसें करीन.

ती उठली. तिनें पांघरुण फेंकले. गुडघ्याला कांहीं तरी खरचटलें. तिनें चांचपून पाहिलें. रक्त आलें होतें. तिनें दिवा लावला. पण लावल्याबरोबर तो विझविला. अंगावर कांहीं नसल्याची जाणीव तिला एकदम आली. असेंच त्याच्या खोलींत कसें जायचें! किती कोंड्या! किती बंधनें! सगळीकडून आपण जखडले गेलों ही भावना वाढली. विचार करतों आहों, पण आतां विचाराला तरी वेळ आहे का! लाटा उपहासानें हंसत मागें जात आहेत. घड्याळाचे कांटे धांवताहेत. वियोगाचा क्षण धांव घेऊन आपल्याकडे निघाला आहे. आणि आपण बंदिवान! सुखाचें ताट समोर, पण हात बांधलेले. तोंडाला मुसक्या! सगळेंच असे. बर्लिनला कार्ले स्टेशनवर होता, पण गुप्त पोलिसांच्या भयानें त्यानें ओळख दिली नाहीं. पोर्ट सैदला कालव्यांत बोट उभी होती. कांठ नुसता उडीच्या अंतरावर होता. पण पॅलेस्टाईनच्या भूमीला पाय लागले नाहीत. समोर जमीन. किती जवळ? पण किती दूर! आजहि पुन्हां तेंच! तिनें शरीर घुसळल्यासारखें केलें. बेड्या तोडल्यासारखें तिला वाटलें. तिचा भास वाढत गेला.

लहानशी केबिन. आंत कुंद हवा. कांळोख. तिला तुरुंगाच्या खोलीचें स्वरूप चढलें. समोर पोर्टहोल होतें. बाहेर लाटांचा खेळ चालू होता.

क्षणमात्र तिला कल्पना आली. आपण सगळे बंध झुगारून दिले. खिडकींतून उडी टाकली. सुटलो. पळालों. सुखाच्या कांचनमृगाचा पाठलाग केला. त्याला धरलें!

ती बर्थवरून उतरली होती. खालच्या बर्थवर आई निजली होती. तिच्याकडे लक्ष जातांच तिचें धैर्य गळालें! तिनें उभ्याउभ्याच वरच्या बिछान्यावर डोकें टेकलें. अपराधाची तीव्र जाणीव झाली. तिनें स्वतःचा निषेध केला.

स्वप्न पडत होतें. आपण बंदिवान झालो. न्यायालयांत आरोपी म्हणून उभें आहों. आसनावर विवेक बसला होता. त्यानें क्रुद्ध स्वरांत हांक मारली "बंदिवान—"

तिनें मान वर केली नाही.

"बंदीशाळेच्या खिडकींतून तूंच उडी टाकून पळालास ना?"

"होय महाराज."

"ती खिडकी जमिनीपासून किती उंच आहे हें तुला दिसलं नाही?"

"नाहीं महाराज. बाहेरच्या जीवनाची अथांग खोली मात्र दिसत होती!"

"आणि खंदकांतलं पाणी? त्याची तुला भीति कशी वाटली नाही?"

"त्यांत मासे खेळत, ते वर येत, उड्या मारीत आणि पुन्हां खालीं जात. मला वाटलं भीति व्यर्थ आहे!"

"तूं पळूं नयेस म्हणून संगिनी घेतलेले पहारेकरी उभे होते!"

"त्यांवर प्रकाश पडे. त्या तळपत. बोटानें दाखविल्यासारखा मुक्तीचा मार्ग दाखवीत. बाहेर बोलावीत."

क्षणमात्र शांतता पसरली. शिक्षेच्या आशंकेनें ती थरथरत होती.

पुन्हां हांक आली, "बंदिवान!"

तिनें मान वर केली नाहीं.

"जा. तूं मुक्त आहेस!"

ती थांबली नाहीं. तिनें मान वर केली. पायांत सँडल्स चढवल्या. अंगावर झगा लपेटून घेतला. निश्चिंतपणें दार उघडले आणि बाहेर पडली.

आई गाढ झोपेंत होती. ती कुशीवर वळली. तिनें निःश्वास सोडला. मुलीच्या कृतीचा तो असहाय निषेध होता का? कीं विचारांच्या तुफानांतून वांचून हॅटी किनाऱ्याला लागली याचें तें समाधान होतें? किंवा मातृत्वाचें सामर्थ्य हरपून बसलेल्या एका स्त्रीचा दुसरीला तो आशीर्वाद तर नसेल!

## —३४—

तिनें पडदा बाजूला सारला. आंत पाऊल टाकलें. मी जागाच होतो. केबिनमधें कुणींहि नव्हतें. असतें तरी तिनें क्वचित्च पर्वा केली असती.

तिच्या आविर्भावानें मी चकित झालों. नुसतें म्हटलें, "हॅटी?"

"होय मीच. मघांशी अर्धवटच अर्थ सांगितला ना? तो पुरा सांगायला आलें आहें!"

कपड्यांच्या कपाटाला टेकून ती उभी राहिली. मला बोलतां येईना. रोखून बघत ती पुढें म्हणाली, "श्लाफेन् ज्वेल मीदनांदर म्हणजे काय, तुला ठाऊक आहे? एकमेकांच्या मिठींत सुखनिद्रा करा!"

तिनें बोलून टाकलें. बोलणें संपलें म्हणून ओठ आवळले. आवेग ओसरला तर पाय गळतील, आपण कोसळून पडूं असें तिला वाटत असावें. तिनें हात मागच्या आरशाला टेकले. माझ्यावरची तिची दृष्टि मात्र ढळली नाहीं. त्यांतल्या उन्मादानें, भक्ष्य स्तिमित होतें तसा मी उभा होतों!

जरा वेळानें तिनें विचारलें, "बोलत नाहींस बॉब?" ती होती जागीच. पण भानावर नव्हती. थोड्याशा भ्यालेल्या स्वरांत मी उत्तर दिलें, "हॅटी असं काय करतेस?"

तिनें दंड दाबून धरले. माझ्याकडे बघत म्हटलें, "पुरे तुझी जपणूक. मला ठाऊक आहे तूं काय सांगणार तें? 'हे, बरं नाहीं, लोक काय म्हणतील?' कुठले रे लोक? जर्मनीचे, कीं इजिप्तचे, कीं हिंदुस्थानचे? यांपैकीं कुठल्याहि देशांत मला जागा नाहीं. तुला समाज आहे, लोक आहेत त्यांची नीति

आहे. मी सगळ्यांतूनच उठलेली ! मला लोक नाहींत. कुठली नीति मी पाळायची सांग. चारा भिंती असल्या, घरं असलीं म्हणजे कपडे घालतां येतात. लाज झांकतां येते. पण तुफानांत सांपडलेल्या माणसानें किती आणि कसं म्हणून सांवरायचं ? वाऱ्याचा सोसाटा, त्यांत लाटांचं निर्दय नाचणं. हाडंसुद्धां खिळखिळीं होतात. तिथं नुसत्या अंगावरच्या वस्त्राच्या फाटून चिंध्या झाल्या तरी तुम्ही लाजेचाच उपदेश करणार ?"

पण ती एकदम थांबली. सगळी शक्ति ओसरण्यापूर्वी झेंप घ्यायला पाहिजे, हें तिनें जाणलं. भावनांची भरती अनावर झाली. मान, खांदे, ऊर, सगळें शरीरच थडथडल्यासारखें होऊं लागलें.

तें दाबून धरीत ती म्हणाली, "एक मागणं मागायला आले आहे, बॉब. तुझ्या डोळ्यांनीं मला पाहिलंस, तुझ्या दृष्टीनें माझ्या देहाला कुरवाळलंस असं—"

पण तिच्यानें बोलवले नाहीं. तिनें ड्रेसिंग गाऊन नुसता पांघरला होता. तो त्वेषानं खालीं टाकला. पोटरींतून बाहेर पडणारें मक्याचे रसरशीत कणीस उभें रहावें तशी ती उभी राहिली !

त्याच वेळीं तिची दृष्टि पहिल्यानें ढळली. तिनें मान खालीं टाकली. वळून मागें टेकली. हात सोडून दिले आणि विव्हळ स्वरांत एवढाच उद्गार काढला, "Oh ! God !"

पडदा वाऱ्यानें फडफडत होता. मी दार लावल्याबरोबर तो थांबला ! पण आरशाच्या चौकटीसमोर तिचें वस्त्रविहीन शरीर थरथरत उभें होतें ! त्यावरचा झंझावात ओसरला नाहीं !

## —३५—

बर्थवर लहान दिवा होता. बाजूनें येणाऱ्या त्या प्रकाशांत तिच्या देहाचें सुवर्ण तळपत होतें. माझी नजर खिळली. हलवून सोडणाऱ्या अनुभवांचा साक्षात्कार होतो, तेव्हां वृत्ति प्रथम चित्राकारासारख्या होतात. रंग, रेषा, छाया, प्रकाश एवढेंच नजरेस येतें. नंतर कल्पनेला आवेश चढतो.

तें चित्र होतें कीं शरीर ! छेः खरें नव्हे. चित्रच. पण आजचें कीं कालचें ? आजच्या चित्राचा प्राण म्हणजे छाया–प्रकाशाचा खेळ ! पण त्या परावर्तित प्रकाशाला आवेशाची धार होती. अर्धें शरीर छायेचें बनलें होतें. त्या छायेला अर्पणाची असहायता होती, आर्द्रता होती ! हें चित्र आजचें असेल का ? कालचें म्हणावें तर किती साधें ! उपऱ्या सौंदर्याचा बडिवार नाहीं. रंगांची उधळमाप नाहीं. साधी आरशाची चौकट. कांचेची पार्श्वभूमि आणि समोर सुंदर स्फटिकाची सजीव मूर्ति. नव्हे. आजचें नव्हे, कालचेंहि नव्हे. मनुष्य जातीच्या इथल्या वास्तव्यांतल्या प्रत्येक काळांतलें, प्रत्येक क्षणाचें. अर्पणोत्सुक स्त्रीच्या शरीराचें हें चित्र आहे !

ओले केंस चिकटून बसले होते. एकच बट कपाळावर आली होती. तिनें प्रश्नचिन्ह उभें केलें होतें ! प्रीतीच्या आवेशाचें तें आव्हान किती मादक व्हावें ! गळ्यांतला मोत्याचा सर थरथरत होता. दीप्तीच्या भुलावणीनें ज्योतीवर उड्या घेणाऱ्या पतंगांच्या फडफडण्यासारखे अंगावर रोमांच उभे ! आणि नाभींतून निघालेली त्रिवळीची रक्तवर्ण लव – पहातां पहातां तिची गुलबकावलीचीं फुलें झालीं. माझ्या आंधळ्या वासनेला त्यांनीं दृष्टि दिली !

## —३६—

स्त्रीदेहाचें मला अप्रूप नव्हतें. गेलीं दोन वर्षें मला आठवलीं. ईश्वरसाक्ष तुम्हाला खरें तें सांगतों. लंडनमध्यें असतांना मी रात्रीचा पिकॅडिलीत भटके. दुकानांत बसलों तरी कांचेच्या दारांतून बाहेर बघें. अफाट गर्दी-तूनहि नेमकी नायकिणींवर नजर जाई. पोलिसांच्या नजरा चुकवून त्या फेऱ्या घालीत. मी त्यांचा पाठलाग करी.

पण ओळखीच्या मुलींकडे मी पुन्हां जात नसे. गळ्यांत येईल या भीतीनें बहुतेक परके प्रवासी असेंच करतात. पण माझें कारण तें नव्हतें. मला चीड येई. एखाद्या ठिकाणीं निष्ठा उत्पन्न होण्याची मला भीति वाटे.

पण दोन वर्षांची गोष्ट कशाला? परवांच्या पॅरिसच्या रात्रीं मला आठवतात. नाचघरें, थेटरें, कॅबेरेज, कांहीं उपहारगृहें, सगळ्या ठिकाणीं स्त्रीच्या नग्न सौंदर्याचें बेसुमार प्रदर्शन मीं पाहिलें होतें. अखेर चार हिंदी स्नेह्यांबरोबर कुंटणखान्यांत गेलों तिथें तर कळस झाला. एक मोठा दिवाणखाना, हिरव्या निळ्या दिव्यांचा मंद उन्मादक प्रकाश. भिंतीवर, छतावर, जमिनीवर, टेबलावर जागजागीं मोठाले आरसे. त्यांतून पन्नास पाऊणशें नायकिणींचा गोंधळ. त्यांच्या नग्न शरीरांचीं शेंकडों प्रतिबिंबें त्या आरशांत दिसत. मद्याचा पूर वहात होता. पुरुषाच्या कल्पनेच्या, आशेच्या, लालसेच्या ओतीव रसानें त्या मूर्तींतलें सौंदर्य घडविलें होतें. जणूं काय ते रस विरघळून, भिंतीवरून, जमिनीवरून, छतावरून वहात होते!

S च्या आकाराची रेषा चित्ररचनेत अत्यंत सुंदर मानतात. स्त्रीची आकृति हा त्या सौंदर्यतेचा जीवंत विलास. पण त्या स्त्रियांची शरीरें बघून मला किळस आली. पुरुषांच्या वासनांच्या प्रहारांनीं त्यांच्या शरीरावर जागजागीं नुसती सूज आलेली वाटे. केंस चिवडीत बसलेल्या, अंगें खाजवीत भोवतालीं गराडा घालणाऱ्या, पुरुषांच्या विकृत वासनांच्या त्या किळसवाण्या नग्न साक्षी शुद्धीवर असतांना बघवणें शक्य नसतें. म्हणूनच मद्याचा तिथें पूर वहातो.

मी बाहेर आलों. वाटाड्या फ्रेंच होता. त्याला सिगरेट दिली व म्हटलें "हेन्री, स्त्रीचं सौंदर्य तें हेंच का?"

त्यानें हंसून उत्तर दिलें, "मशूर या मुली कपडे घालून समोर येत्या, रस्त्यावर फिरत्या तर तुम्ही वळून पाहिलं असतेंत!"

मीं म्हटलें, "लोक चैनीच्या आशेनें इथं येतात तरी कसे?"

त्यानें धूर सोडून म्हटलें, "आपण आलों तसेच!"

"पण आपण परत फिरलों आहों तसें ते फिरतात का?"

"माणसें राहिलीं असलीं तर फिरतात परत. दारू पिऊन पशूच झाले असले तर फिरत नाहींत."

त्याच्या स्वराचें मला आश्चर्य वाटलें. मीं त्याला विचारलें, "हेन्री, तुझं वाटाड्याचं काम. तूं असा चिडतोस कसा?"

त्यानें मान हलवून उत्तर दिलें, " मशूर, इथं आलं, या सगळ्या पोरींकडे पाहिलं, त्यांच्या वळवळणाऱ्या जिभा बघितल्या की किळस येते, मन चिडतं, स्त्रीचा तिटकारा येतो ! काय ही जात ? यांच्या पैकीच एकीच्या, माझ्या आईच्या पोटी माझा जन्म झाला आहे, हें खरं वाटत नाहीं. "

मी वळून मागें पाहिलें. दारांतून त्यांचें फिरणें, त्यांचे चाळे दिसत होते. कांचेच्या कपाटांत ठेवलेल्या सर्पिणीच ! विषारी पण नजर खिळविणाऱ्या !

—३७—

माझ्या निर्ढावलेल्या नजरेला हॅर्टाच्या या स्थितीचें काय वाटणार होतें ? असतें काय एवढे या भुलावर्णात ? स्त्रीचें शरीर ? रक्तामांसाच्या मातीत नवीन रोपटीं वाढविण्यासाठीं सज्ज असलेली सृष्टीच्या बागेंतली ती कुंडी. पण याच शरीराभोवतीं पुरुषांच्या सुंदर स्वप्नांचीं फुलपांखरें बागडत असतात !

त्यांतून दयितेच्या आत्मार्पणाचा असीम आवेग ! त्याच्या प्रवाहांत न वहावणें अशक्यच. पण मला आश्चर्य वाटलें ! असह्य मानसिक ताणामुळें हॅर्टा बेशुद्ध झाली. कपाटाशींच खाली पडली तेव्हां मी भानावर आलों. जागचा उठलों !

तिला अलगज उचललें. बर्थवर ठेवलें. नुकत्याच जन्म झालेल्या लहान अर्भकासारखी ती पडली होती !

## —३८—

सगळ्या पत्रांवर बोटींचे शिक्के आहेत. प्रवासांत तीं लिहिलीं आहेत. मार्गांत लागलेल्या बंदरांवरून आलेली आहेत. ज्या क्रमानें तीं आली त्याच क्रमानें पुढें देतों. त्याचें भाषांतर मीच केलें आहे.

( १ )

मुंबई आणि कोलंबो यांच्यामध्यें

—सप्टें. ३९

बॉब, तुम्ही सगळे गेलांत अखेर ?

सगळे गेलांत आणि मागच्यांना दुःखांत लोटलेंत. हेर कायटेल आपलीं नोटबुकें गुंडाळून बसले आहेत. त्यांचा इंग्रजी शिक्षणाचा उत्साह तात्पुरता मावळला आहे. मि. विध्वंस इंग्रजी छान शिकवीत असें ते म्हणतात.

ओखापल तुला ठाऊक आहेत का ? तुमच्याबरोबर एक अँग्लो-इंडिअन मुलगी होती तिच्या उठवळपणाची तूं थट्टा करीत असस. पण तिचेंच बघून तूं मला पहिल्यांदा जवळ घेतलेंस ! ओखापल आणि तिचें वागणें म्हणजे उठवळपणा नव्हता. त्यांनीं लग्न करायचें ठरविले होतें. ती गेली. आतां ओखापल नुसते बारमध्यें बसून असतात. कुणाशीं बोलत नाहींत. सारखी दारू घेतात.

लुईची तुला आठवण होते का ? ज्यांच्यासाठीं त्यानें आपला जर्मनपणाचा अभिमानसुद्धां सोडला ते त्याचे ' आँकल ' शिंदे त्याला टाकून गेले ! आतां तो मध्येंच आईला म्हणतो, " मुटी, I like English, very much ! " " मुटी, तूं म्हण बघूं, Baby, I like you ! "

डॉक्टर शिंद्यांची आठवण झाली म्हणजे मन भरून येतें. आपल्या सगळ्यांच्या प्रीतीला अपेक्षेचें किल्मिष होतें. पण लुईवरच्या त्यांच्या लोभांत स्वार्थ कसला होता ? ज्या रात्रीं आपण बेभान झालों त्याच रात्रीं त्यांनीं लुईला आपण दत्तक घेतों म्हणून त्याच्या आईला सांगितलें. ती त्याला सोडायला तयार होईना. तेव्हां त्यांनीं दोघांचाहि संभाळ करण्याचें पत्करलें. सगळें ठरलें. मुंबईला दिवसभर खटपटी केल्या.

पण सगळें व्यर्थ ठरलें. तुला जें उत्तर तेच त्यांना मिळालें. टाइम्समधला काळ्या रेघांच्या चौकटींतला तूं दाखविलेला जाड मथळा सारखा डोळ्यापुढें येतो ! तुमच्या आमच्या आशेचा तो मृत्युलेखच होता ! " Britain is at war with Germany ! " आम्हीं जर्मन पासपोर्ट बाळगणारे, जर्मन नागरिक आहों. शत्रु आहों ! हिंदुस्थान आम्हाला बंद झालें.

बॉब, काल आपण सगळे स्नेही होतों. आज शत्रु झालों ! दहा दिवस प्रीतीचे खेळ खेळलों समुद्राच्या अंगणांत. आज सगळें रणांगण झालें ! युद्ध युरोपमध्यें सुरू झालें आहे ! मी जर्मनींतून सुटलें आहें. पण युद्धांतून सुटलें कीं त्यांत सांपडलें ? जर्मनीत असतें तर एखादे वेळी हवाई हल्ल्यांत सांपडतें. एकदांच मरतें ! पण आतां तुझ्या वियोगानें क्षणाक्षणाला मरणाच्या यातना भोगाव्या लागतात !

आपण एकमेकांचे खरेंच शत्रु आहोंत का ? परवां ओळख नव्हती, काल स्नेही झालों आणि आज शत्रु ! तुझ्यामाझ्या प्रीतीच्या पेक्षांहि हा खेळ किती अतर्क्य ! तूं ब्रिटिश नागरिक तरी आहेस. मी जर्मन नागरिकत्व गमावून बसलें आहें. आम्ही परागंदा होतों आहों. तरी आम्ही शत्रु !

पण मी जर्मन आहें ही गोष्ट खरी. आणि राहीनहि जर्मनच ! काळीज तुटतें. तीं सुंदर कुरणें आतां बेचिराख होतील. हिंवाळा नसतांना आपली

अशी वाताहात कां होते आहे याचा अर्थ रानच्या झाडांना कळणार नाहीं ! तोफांच्या गडगडाटानें जर्मनीचें सुंदर आकाश हादरत असेल, भूमि थरकांपत असेल !

आम्ही काय बरें करायचें ? यहुदी द्रोही आहेत असें नाझी म्हणतात. या बोटीवरचे यहुदी म्हणतात,संधि मिळाली तर ब्रिटिश सैन्यांत भरती होऊं, जर्मन नाझींशीं लढूं !

म्हणजे बॉब, आम्ही जर्मन, जर्मनीशीं लढूं म्हणतों आहों ! आहो ना आम्ही घरबुडवे ? जर्मनीचा विजय व्हावा की पराजय ? जर्मनीचा विजय म्हणजे नाझींचा विजय ! छळाच्या, सूडाच्या, लोकशाहीच्या गळचेपीच्या तत्त्वज्ञानाचा विजय ! जर्मनीचा पराजय म्हणजे माझ्या देशाचा पराजय ! काय पत्करूं ? सांग. तत्त्वें मोठीं कीं देश मोठा ?

अशाच वेळीं वाटतें. कामकऱ्यांवर खूप जुलूम व्हावा म्हणजे निराशेच्या त्वेषानें उफाळून ते बंडाला तयार होतील अशी कम्युनिस्टांची इच्छा असते. मला वाटतें, जगभर पसरलेले देशाभिमानाचे संकुचित बंध तुटून जावे. नाझी तत्त्वज्ञान देशादेशांतून फैलावलें तर अल्पसंख्याकांचे छळ होतील, ते देशो-धडीला लागतील. हळुहळू अमुकच देश आपला अशी भावना त्यांच्या पुढच्या पिढीची उरणार नाहीं. जग हीच मानवजातीची मातृभूमि होईल ! माझी आई पोलंडमधली आहे. माझा जन्म बर्लिनमध्यें झाला. माझीं मुलें शांघायमध्यें जन्म घेणार ! आजी पोलंडची, आई जर्मनीची आणि स्वतः चीनचीं असलेलीं तीं मुलें कुठल्या देशासाठीं भांडतील !

पण दूरच्या सुखस्वप्नांसाठीं सुद्धां आज हिटलरशाहीचा विजय नको व्हायला ! आज माझा देश पराभूत झाला तरी चालेल. झोटिंगशाहीचें थैमान जगभर सुरू झालें तर त्या पापाचीं खापरें उद्यां जर्मनीच्याच – माझ्याच देशाच्या माथीं फुटतील ना ?

आणि मला स्वतःला वाटतें, युद्धें आरंभणाऱ्या हिटलरांच्या विरुद्ध आम्ही स्त्रियांनींच लढलें पाहिजे !

आमचाच तो हक्क आहे. सध्यांच्या संस्कृतीनें स्त्रियांशी उभा दावा मांडला आहे ! एका पिढींत दोन युद्धें ! राष्ट्रांचें वैभव आज युद्धाच्या सामर्थ्यावर, संहाराच्या सामर्थ्यावर, माणसें मारण्याच्या शक्तीवर अवलंबून राहतें आहे ! आमचें स्त्रियांचें वैभव निर्मितीच्या सामर्थ्यावर, माणसे जन्माला घालण्याच्या शक्तीवर आधारलेलें असतें ! डॉक्टर शिंद्यांच्या प्रेमळ संगोपनाला अनाथ लुई अंतरला. ओखापलच्या किंवा तुझ्या आणि माझ्या प्रीतिविवाहांत जन्मलीं असतीं तीं मुलें अजात राहिलीं ! मी, लुईची आई, इथें असती तर ती ख्रिश्चन तरुणी, आम्ही युद्धाविरुद्ध एक झालें असतों ! उद्यां सैन्यभरतीसाठीं ज्यांचे बाप, भाऊ, प्रियकर किंवा नवरे अंतरतील त्या जगांतल्या सगळ्या स्त्रियांना एकत्र होणें, झोटिंगशाहीच्या विरुद्ध लढणें अशक्य कां आहे ?

बॉब, मी ब्रिटिशांच्या वतीनें लढायला गेलें तर मला सैन्यांत घेतील का रे ?

हॅर्टी

( २ )

कोलंबो–सिंगापूर.

काल वाटे, जगभर डोंब उसळला आहे. आतां व्यक्तीच्या सुखदुःखाचा कोण केवा !

मुक्या माराची जागा दुसऱ्याच दिवशीं जास्त ठणकूं लागते. लिहून गेलें तुझ्यामाझ्या प्रीतिविवाहाबद्दल. आतां खरें सुद्धां वाटत नाहीं.

पहांटे तूं उठलास, मला डेकवर आणलेंस, आणि म्हणालास, "हॅर्टी, मी तुझ्याशीं लग्न करीन म्हणतों !" मला आभाळ ठेंगणें झालें. शांघायहून परत येण्याची आशा वाटूं लागली. माझा विश्वास बसेना. कांही काळ मी आनंदानें हतबुद्ध झालें !

बॉब, पहिल्या दिवशीं तूं मला जवळ घेतलेंस आणि पश्चात्तापानें लागलीच दूर झालास. मला म्हणालास, "हॅर्टी, या वागण्याला शेवट नाही. मला तुझ्याशीं लग्न करतां येत नाहीं."

तेव्हांच मी तुला सांगितलें होतें. प्रीतीच्या खेळांत मन जी सुखसीमा गांठतें तेवढा शेवट मला पुरे आहे ! माझ्या जीवनाची लांबलचक काळोखी रात्र झाली होती. तुझ्या स्नेहाचे क्षण तेवढेच त्यांत प्रकाशाच्या तिरपेसारखे आले. तेवढ्यावरच मी भुललें. तेवढ्यावरच मी संतुष्ट होते.

त्या दिवशीं सकाळीं तूं लग्नाला कां बरें तयार झालास ? तुझे आवडते तत्त्वज्ञान मला माहित आहे. स्त्री पुरुषाची शिकार करते. सगळे यत्न थकले म्हणजे ती त्याच्या मार्गात मोहाची जाळी पसरते. त्याच्याकडून स्वतःचे अपराध करवून घेते. अपराधीपणाची जाणीव त्याला झाली म्हणजे भरपाई-साठीं पुरुष वाटेल तो त्याग करतो. तिचा अंकित होतो. असेच ना ?

जातांनासुद्धां तूं माझी क्षमा मागितलीस. काय बरें तूं माझा अपराध केलास ? त्या रात्रीं सुद्धां तूंच मला सावरलेंस ! बॉब, माझ्याशीं लग्नाला तूं तयार झालास, त्यांत कसल्या भरपाईची भावना होती तुझी ?

बर्लिनला होतें. एकटेपणा असह्य होई. तेव्हां मी बुद्धिबळाचा खेळ काढावा. समोरची रिकामी खुर्ची ही माझी प्रतिस्पर्धी. तिची मोहरी मी खेळवावीं. माझीहि मीच खेळें. पुष्कळदां मीच हरें. आपला खेळहि असाच एकतर्फी होता ना ? मींच लोभ केला. तुझ्याकडून करवून घेतला. तुला स्त्रीची ओळख आहे हें मला दिसले. तिच्या तिटकाऱ्याचें नाटक करणें तुझ्या आवडीचें आहे हेंहि मीं पाहिलें. माझी ओढ असीम होती. तुझ्या इच्छेविरुद्धहि तुला ओढून तिनें तुला धारेला लावलें हें मला माहित होतें. तुझें जर माझ्यावर प्रेम नव्हतें तर माझ्याशी लग्नाला तूं कां तयार झालास ? बॉब, निव्वळ माझी दया येऊन ?

बॉब, मला दया नको. आश्रयाची सुद्धां गरज नाहीं. मि. मन्नान मला लग्नाचा आग्रह शेवटपर्यंत करीत होते. त्यांना तुझा राग येई. आपली ओळख बघवत नसे. त्यांच्याशीं लग्न केल्यानंतर दिसणाऱ्या सुखाच्या दिवसांचीं चित्रें ते सारखीं रंगवीत. मला त्यांचा राग येत नसे. पण कंटाळा येई. मीं त्यांना नकार दिला.

# रणांगण

तूं भेटला नसतास तर काय केलें असतें कोण जाणे ? त्यांचा स्वभाव भारी प्रेमळ आहे. महत्त्वाकांक्षी आहे. एडननंतर त्यांनीं माझी आणि आईची किती काळजी घेतली ! एक दिवस तर मी भानावरच नव्हतें. ते फळें आणीत, खाण्याचा आग्रह करीत; आणि मी म्हणे, "बॉब, फळें नकोत रे. थोडी ब्रँडी दे."

पण त्यांनीं राग केला नाहीं. माझी शुश्रूषा सोडली नाहीं. किती विखार गिळला असेल ? आदल्या रात्रीं निरोप घेण्यासाठीं ते आमच्या केबिनमधें आले. मला म्हणाले, "फ्राउलाईन, तुम्हाला माझी शपथ आहे. मी सांगतों तें आईना जर्मनमधें जसेंच्या तसें सांगा." मला कल्पना नव्हती. मीं कबूल केलें.

आईला इंग्रजी मुळींच समजत नाही. ती त्यांच्या चेहेऱ्याकडे बघत होती नुसती – गळा दाटून आला. त्याच आवाजांत ते म्हणाले, "आई, मला बाप नाहीं, आई नाहीं. घरचा चांगला आहे. तुमच्या मुलीवर माझा फार जीव आहे. किती आहे तें काय सांगूं ? तिला माझी बायको व्हायला सांगा. तुम्ही आमची आई व्हा !"

मला भडभडून आलें. तेहि रडत होते. माझ्यानें बोलवेना. आई बिचारी हतबुद्ध झाली ! आपण नाचाला गेलों, त्याच्या आधींची गोष्ट. आईचें माझें थोडें भांडणहि झाले !

त्यांचीं स्वप्नें इस्लामच्या गौरवाचीं आहेत. हिंदुस्थानांत हिंदु उरणार नाहींत, त्या दिवसाची ते आतुरतेनें वाट पहातात. त्यांच्याशीं लग्न केलें तर उद्यां आमच्या मुलांना तुझ्या मुलांचा द्वेष करायला आम्ही शिकवले असतें !

पण नको ती कल्पना. तूं भेटलास ना ? या दहा दिवसांच्या आठवणीवर मी पुष्कळ दिवस जगेन.

हॅर्टा.

( ३ )

सिंगापूर—मणिला

पुरे बॉब. मन आवरायचें तरी किती? मला तूं हवा आहेस. तूं भेटत नाहींस. माझें मन विदीर्ण होतें!

अशीच शिक्षा पाहिजे. मी पापी आहें. अपराधी आहें. तूं कोण कुठला हें माहीत नव्हतें. आलास आणि गेलासहि. पण तुझ्यावर प्रेम केलें. जनाची लाज सोडली. मनाचीहि अखेर झुगारून दिली. कार्लच्या प्रीतीचा गळा दाबला. यापेक्षां काय अपराध करायचे? मला हीच शिक्षा पाहिजे.

सुस्थित, सुरक्षित जीवनांतल्या माझ्या भगिनी मला क्षमा करोत! बिचाऱ्या भाग्यवान् आहेत. त्यांच्या प्रीतीचा ध्रुव अढळ राहतो. भक्तीचें दैवत भ्रष्ट होत नाहीं. निष्ठेला सातत्याचा वर लाभतो! मी स्त्रीच ना? मी कां बरें असें केलें?

बॉब, मी उत्पातांत सांपडलेली असहाय स्त्री आहें. झाड मोडून पडलें तरी वेल उपटलीच जाते असें नाही. पण माझीं पाळेंमुळें खणून काढलेलीं. आम्ही बायका थिल्लर मनाच्या असतों. पण स्वार्थाला जागरूक असतों. आणि प्रीतीचें दान तर दुसऱ्याच्या तनमनधनाची तुला घेऊनच करतों! मला आठवतें. कळायला लागलें तेव्हांपासून मी पुष्कळदां आकर्षित झाले. आमच्यासमोर तमाखूचें दुकान होतें. तिथल्या मुलाचें हंसणें भारी गोड असे. पण बोलणें मूर्खपणाचें! घरीं एक डॉक्टर येत. धिप्पाड, नेहमी गंभीर, पण कामांत खूप वाकबगार. त्यांच्या अंगीं सामर्थ्य वाटे. पण त्यांच्यांत थोडासुद्धां हळवेपणा नव्हता! बर्लिनला माझ्या कॉलेजमध्यें एक दिवस नवीन प्रोफेसर आले. हंसतमुख, हुषार आणि खूप विद्वान्. पण त्यांचें मन अर्धांग गेल्यासारखें होतें! त्यांना पुस्तकाबाहेरच्या जगाचा गंधहि नव्हता!

सगळ्यांच्या बरोबर मी खेळलें, फिरलें, नाचलें, बागडले. भुंगा फुलांत रमतो, पण घर करतो तें लांकडाची जाड तुळई बघून! मला कार्ल भेटला. त्याची वागण्यांतली ऐट, बोलण्याचा आवेश, कणखर विनोदी वृत्ति, सगळ्यांचा मला मोह पडला. त्याच्या स्वराला धार असे. हंसण्यांत मोकळे-

पणा होता. तो हुषार होता. विद्वान् नव्हता, पण समर्थ होता. त्याच्या मुठींत मी स्वतःला निरवलें आणि भविष्याविषयीं निश्चित झाले.

त्यानंतर प्रळय झाला. आमची घरें जमीनदोस्त झालीं. स्वप्नेंहि धुळीला मिळालीं. छळ, अपमान, उपहास, जुलूम, सगळ्यांचा कहर झाला ! सुखाच्या मोकळ्या मैदानांत वारा प्याल्यासारखें धांवणारें मनाचें वासरूं घरांत आलें. त्यानें भोंवताली कोंडवाडे उभारले. आपण बंदिवान् आहोंत हेंसुद्धां तें विसरलें. बाहेरच्या जगाची त्याला भीति वाटूं लागली.

बोटीवर आलें तेव्हां अशी स्थिति होती. पानगृहांत तूं पत्ते खेळत होतास. तूं मोठ्यानें मनमोकळें हंसलास. माझें तुझ्याकडे लक्ष गेलें. बॉब, जुन्या करारांत ज्या जेरिको नगराची गोष्ट आहे त्या नगराचे तट इस्रलाइटांच्या आगमनाच्या तुतारींच्या नादानें हादरले आणि ढांसळले. नगर मुक्त झाले. तुझ्या निर्भय हास्याच्या निनादानें त्या कोंडवाड्याच्या भिंती अशाच जमीनदोस्त झाल्या ! माझ्या मनाचें गांव तुझ्या स्वागतासाठीं आतुर झालें ! आणि आपली नजर मिळाली ! अहा ! अंगावर उठले ते रोमांच त्या स्वागताची तोरणें. उरांतली धडधड हा त्या आनंदाचा जयघोष !

पुष्कळदां मला वाटतें, आम्ही बायका पुरुषांवर प्रेम करीत नाहीं. स्वतःच्या मनोधर्मावर करतों. आमच्या अपेक्षा असतात. आशा असतात. त्या पुऱ्या होतील असे दिसतें त्या स्थळावर आमचें लक्ष जडतें. एखादें हरपलें तर दुसरें त्याच जातीचें दिसेपर्यंत मन निपचित पडून राहतें. दिसल्याबरोबर डोळे उघडून बघतें, जागें होतें. परलोकविद्येच्या पुस्तकांत मीं वाचलें आहे. ज्या माणसांना संचार होण्याची शक्ति असते त्यांना कांहीं ठराविक ठिकाणीं, ठराविक वातावरणाचा भास झाला कीं भान हरपतें. प्रीतीच्या संचाराची शक्तीहि अशीच तिच्या तीर्थाच्या दर्शनानें जागी होते. तूं याला द्रोह म्हणशील का ?

तुझ्याकडे माझें लक्ष प्रथम असेंच गेलें. तुझ्यांत कार्लेची ऐट आहे. भेटलों त्या दिवशीं तुझा पोषाख व्यवस्थित नव्हता, पण त्यांत बेदरकारी होती. ती तुझ्या स्वतःच्या प्रत्ययाची साक्ष देत होती. कार्लेसारखेंच तुझें हंसणें कानांत

घुमतें, बोलणें मन निनादून सोडतें ! मन्नानमध्यें आर्जवीपणा होता; पण
प्रीतीचा खेळसुद्धां लढाईसारखा खेळतोस ! तसूतसू हटतोस, तोसुद्धां र
बंबाळ होऊन किंवा दुसऱ्याला तसें करून ! आणि माझ्या आवडत्या पोर
अखेर जिंकतोस तेव्हांसुद्धां स्वतःच हरल्याचें किती मोहक दाक्षि
दाखवितोस !

अनेक दुःखांच्या अपघातांनीं, आशंकांनीं, भीतीनें माझ्या काळजाचें पा
होतें. त्या मनाचा तूं स्वीकार केलास. येशूच्या नुसत्या नजरेनें पेल्यांत
पाण्याचें सुंदर मद्य झालें ! तुझ्या स्वीकारानें माझ्या सांठलेल्या, गढू
जीवनाला आशेची आरक्तता आणली ! नेहमीं कठोर भासणाऱ्या तुझ्
नजरेंत क्वचित् आर्द्रता चमकते. त्या खोल दडलेल्या झऱ्याचा शोध लावण्
साठीं मन उत्सुक होतें. तुझा कठोरपणा. कितीहि खणत रहावें लागलें,
पडले, प्राण कासावीस झाले तरी त्या श्रमांत आनंद होता. आणि शे
थकून मनाचें वेडें पांखरूं तुझ्या हातीं सोंपविलें कीं पहातां पहातां
स्वतःच नाजुक होतोस ! मधुर शब्दांच्या फुलांचे, कल्पनांचे हिंदोळे बांध
देतोस, त्यावर तें झुलवीत बसतोस.

हेंच प्रीतीचें अपार वैभव माझ्या अपुऱ्या हातांनीं लुटण्याचा
वारंवार यत्न केला. तरीहि तें उरलेंच ! तूं मला हवा आहेस, बॉब. पण
मिळत नाहींस म्हणून मन शतशः विदीर्ण होतें !

हॅर्टा

---